







नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








कोयनानगरच्या भीषण भूकंपात अनेक ज्ञात अज्ञात बांधवांची आहुति पडली, त्या साऱ्या साऱ्या मृतांना साश्रुनयनांनी श्रद्धांजली आणि हजारो जखमी वा बेघर झालेल्या भूकंपग्रस्तांना व्यथित अंतःकरणाने सहानुभूति.



जानेवारी १९६८
वर्ष २३ वे
मूल्य १। रु.

# दीपावली

रसिक महाराष्ट्राचा साहित्य कला-विलास

## श्रे य ना मा व लि–



## मर्मभेदक राजकीय बिंगचित्रे

याशिवाय रंगमंच, ऐसी अक्षरे, दीपमाला, इंद्रधनुष्य ही नेहमीची चटकदार सदरे आणि विनोदी किंचित्काव्ये इ. इ.

Gram: Dalalart
टे. नं. ३५७७६५




★ संपादक–मुद्रक–प्रकाशक–मालक श्री. **दीनानाथ दलाल**, दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. यानी स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमि भवन, घोगा स्ट्रीट येथे छापले. या प्रतीस किंमत १। रु. + रजि. पोस्ट ६० पै. वार्षिक वर्गणी, दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकांत प्रसिद्ध झालेली मतें ही चालकांचीहि अधिकृत मते असतातच असे नाही. प्रकाशित चित्रें व लेख यावरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन आहेत.
Registered with the Registrar of Newspapers for India under No. RN 1612/57
DIPAVALI: Dalal Art Studio, 40-42, Kennedy Bridge, Bombay-4.













**दलाल आर्ट स्टुडिओ**

४२, केनेडी ब्रीज, मुंबई, ४

टेलिफोन : ३५७७६५ ★ तारेचा पत्ता DALALART

● **वर्गणीदारास सूचना :** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० पैसे. द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशी वार्षिक वर्गणी १६–००**

● **वर्गणी** मनिऑर्डरने द्यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नांवे, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होता येते.

● **अंक न पोचल्याच** कळवावयाचे झाल्यास ५ तारखेपर्यंत वाट पाहून मग कळवावे. अंक ऑफिसमध्ये शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो गिऱ्हाईकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यात येते. तरीहि तांत्रिक अडचणीमुळे अगर अन्य कारणामुळे जाहिरातीत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिन्याभरात सामान्यत: कळविला जातो. पोस्टेज असलेले नापसंत साहित्य परत पाठविले जाते. पुरेसे पोस्टेज नसल्यास ते निकालात काढले जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झाले तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकावर नाही.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल** यांनी स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमि भवन, घोगा स्ट्रीट, फोर्ट, मुंबई १ येथे छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४ येथे प्रसिद्ध केले.


# महाराष्ट्राची 'भाग्यलक्ष्मी' थरारली आहे !!

भूमी थरारली. पाणी थरारले. वीज थरारली. माणसे थरारली. काही गाडली गेली. काही कोसळली पण मेली नाहीत. मातीतून उभी राहिली. नव्या प्रेरणा घेऊन उभी राहिली. काही अजून मरणाशी झुंज घेत पडली आहेत. त्या थरारलेल्या माणसातून कुणीतरी एखादा निघतो – कर्तव्याची चाड असलेला. तो जवळच्या खांबावर चढतो आणि खांबावरच्या तारांना टेलिफोनच्या तारा जोडतो आणि पुण्या-मुंबईला संदेश देतो धोक्याचा ! माणसे धावतात. मदतीसाठी...मृत्यूशी झुंज देणाऱ्या माणसांना 'जीव' देण्यासाठी. रक्त देण्यासाठी रक्ताचे नाते सिद्ध करण्यासाठी. कोसळलेले कपाट एका लहान मुलाला 'कुशीत' घेते आणि ज्याच्या 'चिंध्या' हाती यायच्या तो मुलगा जसाच्या तस्सा गवसतो. मेहरूणच्या तलावावर नौका विहरतात. पाण्यावर पक्ष्यांची किलबिल सुरू होते. वर आकाश, खाली पाणी–मध्ये विहरणारी ती बोट. एक ट्रीप आली फिरून. काठावरच्या चिमण्या हसत होत्या–नाचत होत्या, गात होत्या आनंदाचे गीत . मग त्या चिमण्यांची आली पाळी. हसण्या–नाचण्याची, आनंदाचे गीत नौकेत बसून गाण्याची ! त्या चढल्या नौकेवर. पण त्या नौकेने रुप काय असे पालटले कुणाला काही कळले नाही. नावेला कळले नाही. नावाड्याला कळले नाही. चिमण्यांना कळले नाही. त्या शांत जलाशयाला कळले नाही. काठावरच्या चिमण्या चिवचिवत राहिल्या. त्यातून घुमली एक भयानक किंकाळी ! मृत्यूची! चिमण्या पाण्याच्या पोटात स्थिरावल्या. संपले सारे. थरारले पाणी, थरारली माणसे. थरारला मृत्यूही !

पश्चिम बंगालमध्ये राज्य गडगडले. थरारली डावी शक्ति. थैमानाचा संकल्प उच्चारला गेला. वानगीदाखल काही गोळ्या उडाल्या. मोटारी पेटल्या. माणसे दगावली. राज्य थरारले. माणसे थरारली. स्थिर जीवन ढळले. दिल्ली, लखनौ, कानपूर, जयपूर, बनारस ह्या ठिकाणी भाषेने थैमान घातले. एकतेलाच आव्हाने मिळाली. थरारली ! देवी–भारतमाता म्हणाली, "पोरांनो, हे काय आरंभलय् ? दक्षिण विरुद्ध उत्तर, पूर्व विरुद्ध पश्चिम. मग थरारा गेला कोयनेला. सांगलीला. तेथे उठली भावंडे, ठाकली रणमैदानात. पुन्हा आईने ढाळले अश्रु. रडली ढसढस। आपल्याच पोरांसाठी. अखेर असाच उलटा इतिहास पुन्हा घडणार आहे ? ही बाळे आपसातच लढत राहाणार आहेत ? महाजन अहवाल आला. होळ्या पेटल्या. दुसऱ्या गल्लीत शिवीगाळ झाली. बोंब उठली. आव्हाने–शड्डू मारणे. नव्या (विनाशाच्या) प्रतिज्ञा घेतल्या जाणे.

हेच ते चित्र? हीच क्रांति? ऐक्य घसरते आहे. साखर सरत आहे. विष भिनत चालले आहे. कैफ, बेहोषी वाढते आहे. माणसांच्या मनांवर स्वार होऊ पाहाताहेत विनाशाची भुते ! बेकीचे राक्षस मोकाट सुटले आहेत. रक्ताला रक्त ओळखीनासे होते आहे की काय असे भासते आहे. अखेर यातून साधणार काय ? ऐक्य ? घडणार आहे क्रांति ? घडणार आहे नवा मानव ? वैभव खेचून आणणारा–आपदांवर मात करणारा ?

महाराष्ट्राची 'भाग्यलक्ष्मी' थरारली आहे. कोयना क्रुद्ध झाली आहे. ज्यांनी घामाचे रक्त आणि रक्ताचा घाम गाळून ही भूमि सुजलाम्, सुफलाम् केली त्यांची मने जणु थरारली आहेत. मातीचा द्रोह पाहून काळी माती थरारली आहे. सह्याद्रीच्या सहवासात शतकानुशतके राहूनही सह्याद्रीचे मन न लाभलेल्या नतद्रष्टांसाठी सह्याद्रि थरारला आहे. सह्याद्रीचाच संताप तो ! निरपराध जीवांची हत्या झाली. नतद्रष्ट भांडतच राहिले. राहतील. ह्या थराराचा अर्थ त्यांना कधीतरी गवसेल काय ? हे थरार म्हणजे मृत्यूचे आमंत्रण आहे. नव्हे ते आहेत शॉक्स ! माणसातला माणूस राखणारे. क्वचित प्रसंगी माणसातल्या देवत्वाला आव्हान करणारे ! ! मेहरुणच्या चिमण्या, कोयनेचा थरारा, असंख्यांची हत्या, भाषिक युद्धे, सीमायुद्धे, भूमीयुद्धे, ह्यातून सावध व्हा ! 'थरारलेल्या' माणसांना 'स्थिर' बुद्धीने मदत करा. त्यांच्या पाठीशी उभा रहा.

सह्याद्रीचा ताठ कणा तुझे गौरवगीत गाणार आहे. महाराष्ट्रा, तुला हे सारे सोसलेच पाहिजे. हा थरार छातीवर झेललाच पाहिजे. धर्म म्हणून तू हे केलेच पाहिजे.

— संपादक



अनुक्रमणिका





अनुक्रमणिका

### एक बहुरंगी, बहुढंगी, बहुरूपी व्यक्तित्व

# बाबूराव पेंढारकर

—प्रभाकर अत्रे

**बाबूराव** पेंढारकर ह्या नावाने महाराष्ट्राच्या व भारताच्या चित्रविश्वात सुप्रसिद्ध असलेली व्यक्ति काळाच्या पडद्यात निघून गेली आहे. माणूस गेला, देह संपला. तो जाणारच होता वगैरे तात्विक चर्चा खरी असली तरी गेलेल्या माणसाने दुःख दिलेले असतेच. पोकळी निर्माण केलेली असतेच. "ती कधीही भरून येणार नाही." वगैरेही नेहमीच बोलले जाते. ते नेहमीच खरे असते असेही नाही. पण कलेच्या क्षेत्रात, जीवनाच्या विविध क्षेत्रात जी माणसे काही मोठे करून जातात, त्यांच्या जाण्याने खरोखरच एक प्रकारची पोकळी निर्माण होत असते हे नाकारता येत नाही. **बाबूराव पेंढारकर** ही व्यक्ति महाराष्ट्राच्या कलाजीवनात असे काही अजोड करून गेली की, त्यांचे निर्वाण हे पोकळी निर्माण करणारे ठरावे. कलेच्या क्षेत्रातले पायाचे दगड नेहमीच उपेक्षा सहन करीत आलेले असतात. बाबूराव पेंढारकर हे केवळ अपघाताने नट झाले नसते व त्या क्षेत्रातली नवी आव्हाने त्यांनी जिद्दीने स्वीकारली नसती तर कदाचित् तेही उपेक्षित राहिले असते. मॅनेजर, व्यवस्थापक, निर्मिती प्रमुख वा व्यवस्थापक हा काही सामान्य प्रेक्षकांचे दृष्टीने महत्वाचा घटक नाही. चित्रपटात जी माणसे समोर, पडद्यावर ह्या ना त्या रूपाने, दिसतात त्यांना प्रेक्षक ओळखतात. त्यांना 'दाद' देतात. त्यातही साऱ्यानाच अशी दाद मिळतेच असेही नाही. जे 'चाळीसावे चोर' अखेरपर्यंत 'बुधल्यात' राहतात, त्यांना ही दाद मिळू शकत नाही. केवळ अपघात म्हणून भगवान विष्णूचा मेकअप् करून बाबूराव कॅमेऱ्यासमोर उभे राहिले. आणि अखेर विष्णूने केलेल्या स्पर्शानेच जणु किमया केली. मॅनेजरच्या चेंबरमध्ये (तेव्हा चेंबरही नसावा) बसणारा हा महत्वाकांक्षी, जिद्दी माणूस अखेर विष्णूच्याच इच्छेने महाराष्ट्राचा 'नटवर्य' झाला. बाबूराव पेंढारकर ही व्यक्ति आता काळाच्या उदरात गेली असली तरी नटवर्य बाबूराव पेंढारकर ही व्यक्ति—हा कलाकार मागे आपल्या श्रेष्ठ अभिनयकलेचे अनेक नमुने मागे ठेवून निघून गेला आहे.

बाबूराव पेंढारकर ही चित्रव्यवसायातली एक व्यक्ति नव्हती. ती एक शक्ति होती. स्वतःच्या पदराला खार लावून, भव्य स्वप्ने साकार करणारी माणसेच जीवनमार्गावर आपले ठसे उमटवून जात असतात. बाबूराव पेंढारकर यांच्या वाट्याला प्रारंभकाली अनेक भूमिका आल्या. त्या वठवीत असताना ते कधी शिक्षक झाले. कधी झाले कंपाऊंडर. पण त्या भूमिका त्यांनी (विशेषतः शिक्षकाची) चांगल्या वठविल्या. कंपाऊंडरची नोकरी मात्र सुगंधी अत्तरामुळे सुटली, हे वाचून मोठी गंमत वाटली. आयुष्यात लहान सहान गोष्टी अशा घडतात की ज्यातून आयुष्याला एक आगळीच कलाटणी मिळते. माणसे तशी चाचपडत असतात, आपला 'विषय' शोधीतच असतात. काहीना तो लवकर सापडतो. काहीना उशिरा. काही गतानुगतिक आयुष्य काढीतच राहतात. बाबूरावांना मी 'सिनेनट' होणार आहे असे स्वप्न पडले नव्हते. पण बाबूरावांचे चाचपडणे, त्यांची अस्वस्थ मनस्थिति ह्याना ते जेव्हा आनंदराव मेस्त्री, फत्तेलाल दामले यांच्या सहवासात गेले तेव्हा एक आगळे वळण लागले. कलेच्या क्षेत्रातली ही धडपडणारी मुले होती. त्यांच्या त्या धडपडीतूनच पहिली महाराष्ट्रीय फिल्म कंपनी जन्म पावली. बाबूराव त्या प्रारंभकाळाचे वर्णन सुद्धा अतिशय स्थितप्रज्ञ वृत्तीने आपल्या आत्मचरित्रात करताना दिसतात. ज्या ज्या कलांना काही सामाजिक संदर्भ आहे त्या त्या क्षेत्रात काम केलेल्या कलावंतांचे आत्मचरित्र हे केवळ त्या त्या व्यक्तीचे आत्मचरित्र रहात नाही. बाबूराव पेंढारकर यांचे '**चित्र आणि चरित्र**' हेही ह्या नियमाला अपवाद नाही. त्या चरित्रातला प्रारंभीचा भाग तर मराठी चित्रव्यवसायातल्या प्रारंभीच्या जडणघडणीचा इतिहास आहे. त्या व त्यानंतरच्या कालातल्या अनुभवातून आजच्या मराठी चित्रव्यवसायालाही बऱ्याच गोष्टी शिकता येण्यासारख्या आहेत असे मला वाटते.

बाबूराव पेंढारकर ह्या व्यक्तीच्या कलाजीवनाचा विचार करताना त्यांनी निर्माता, व्यवस्थापक म्हणून सतत जी








कामगिरी केली आहे तिचा विचार करणे आवश्यक आहे असे मला वाटते. बाबूराव पेंढारकर वैयक्तिक जीवनात कितीही स्वैर असले, बेशिस्त असले, बेधुंद व कलंदर वृत्तीचे असले तरी कलेच्या क्षेत्रात मात्र बाबूराव फार शिस्तीचे होते. नेकीचे होते. बाबूराव त्या क्षेत्रात द्रष्टे होते. प्रारंभकाली त्यांनी मॅनेजरकी पत्करली ती पत्करताना पगाराची बात नव्हती. पण काहीतरी आगळे–वेगळे घडते आहे ह्या जाणीवेने ते तेथे राहिले. बाबूराव पेंटरांच्या अनेक लहरी पचवून राहिले. कलावंत हा काहीसा लहरी असतो असे म्हणतात. बाबूराव पेंटर 'काहीसे' लहरी नव्हते–बरेच लहरी होते. जो निर्माणक कलाकार (Creative Artist) असतो तो अधिक लहरी असतो असे दिसून येते. बाबूराव पेंटर ह्यानी स्वतः कॅमेरा तयार केला. पेंटरांची कला फार मोठी होती तिच्या मुळेच ह्या क्षेत्रात पेंटर काही चमत्कार करू शकले. पण पेंटरांबद्दल योग्य तो आदर असूनही बाबूराव पेंढारकरांच्या शिस्तशीर 'व्यवस्थापना'ला त्याचा लहरी स्वभाव कसा आड येत गेला हे त्यांनी मोकळेपणाने लिहिले आहे. काही प्रमाणात पेंटरांचे वागणे हे अमानुष पातळीवरही गेलेले दिसते. पण ह्यातून चित्रपट व्यवसायाची कशी अवहेलना झाली–हानी झाली ते मांडणारे बाबूराव किती तळमळीने ह्या व्यवसायाचा विचार करीत होते हे दिसून येते.

बाबूरावांची चित्रव्यवसायातली कामगिरी दुरंगी आहे. निर्माता-व्यवस्थापक-संघटक–कल्पक द्रष्टा अशा अनेक गोष्टी त्यात आहेत. शांतारामबापू हे हुबळीला एका कारखान्यात नौकरी करीत होते. त्यांना पगार मिळत होता. त्यातून ते घरी चार पैसे पाठवू शकत होते. पण शांतारामबापूंचा स्वभाव माहीत असल्याने बाबूराव पेंढारकर यांनी त्यांना ती नौकरी सोडून चित्रव्यवसायात खेचून नेले. पगाराबद्दल बापूनी विचारले तेव्हा 'राहण्या जेवण्याची व्यवस्था केली आहे. तिच्या पोटी पगार' असे उत्तर देऊन त्यांनी वेळ मारून नेली. पण त्या खोटेपणातून एक सच्चा व द्रष्टा–कल्पक निर्माता दिग्दर्शक मराठी चित्रव्यवसायाला, भारतीय चित्रव्यवसायाला मिळाला आहे. बाबूरावांचे हे ॠण भारतीय चित्रसृष्टीला विसरता येणार नाही.

बाबूराव नुसते मॅनेजर नव्हते ह्याचे आणखी एक गमक सांगता येण्यासारखे आहे. नवे नवे चित्रपट निघतच असतात. त्यांना जे 'व्यक्तित्व' देऊ शकतात ते मोठे निर्माते-दिग्दर्शक होत. बाबूराव पेंढारकरांनी प्रभातमध्ये काय किंवा हंसमध्ये काय चित्रव्यवसा-

**कलाजीवन आणि व्यक्तिजीवन ह्यातील लक्ष्मणरेषा ओळखून कलेचा डौल व तोल अखेरपर्यंत बाबूरावानी राखला. बाबुराव जीवनात घसरले असतील (ही) पण कलेच्या दरबारात मात्र त्यांनी 'शान'च राखली....**



याला कडक शिस्त लावण्याचा प्रयत्न केला. प्रभातमध्ये ते नोकर होते. नटही होते. परंतु त्यातून बाहेर पडून 'हंस' चे स्वतंत्र क्षेत्र त्याना मिळाले तेव्हा त्यानी एक नवे धाडस केले. ते मराठी चित्रसृष्टीत 'हंस' चा वारसा ठेऊन जाण्याइतपत मोठे ठरले ही गोष्ट मला स्वतःला अतिशय महत्वाची वाटते. स्वतःची भूमिका चांगली व्हावी एवढ्यापुरतेच सामान्यतः नटाचे स्वप्न मर्यादित असते. बाबूराव नट-निर्माते होते. आचार्य अत्रे, खांडेकर, ठाकरे, शुक्ल आदि साहित्यिक मंडळीचा उपयोग ह्या व्यवसायासाठी करून घ्यावा हे जाणणारा कल्पक निर्माता म्हणून बाबूरावांची कामगिरी महत्वपूर्णच म्हणावी लागेल. ऐतिहासिक, पौराणिक, स्टंट, रोमॅंटिक ह्या पातळ्यांवरून चित्रव्यवसायाला त्यांनी जनसामान्यांच्या जवळ आणले आणि सामाजिक, विनोदी, उपहासात्मक अशा चित्रपटांचे एक नवे युग (हंस युग असे मी श्रद्धेने मानीत आलो आहे) त्यानी निर्माण केले. विनायकसारखा एक श्रेष्ठ दिग्दर्शक त्यातून उदयाला आला. विनायकसारखा भाऊ व बाबूरावांसारखा कुशल व शिस्तीचा संघटक ह्यांची युति टिकली असती तर 'हंस, नवयुग' युग इतक्या लवकर संपले नसते अशी माझी धारणा आहे. छाया, ज्वाला, देवता, सुखाचा शोध, धर्मवीर, प्रेमवीर, ब्रह्मचारी, अर्धांगी, ब्रॅंडीची बाटली अशा कितीतरी उत्तम बोलपटांनी हे नवे युग साजरे झाले. 'प्रभात' नेही सामाजिक चित्रपट दिले आहेत (कुंकू, माणूस, माझा मुलगावगैरे) पण सामाजिक चित्रांचे नवे युग निर्माण करण्याचे श्रेय मात्र खास

हंसचे आणि हंसचेच आहे असे आजही म्हणता येऊ शकते. 'विलासी ईश्वर' ह्या कोल्हापूर सिनेट'नच्या पहिल्या चित्राला दिग्दर्शक विनायक हे नाव केवळ बाबूराव पेंढारकरांच्या आग्रहाने लाभले. चित्रपट तसा गाजला नाही. 'हंस' च्या वेळीही पुन्हा पांडुरंगराव नाइकांनी शंका व्यक्त केली तेव्हाही विनायकाचे सुप्त कर्तृत्व ठाऊक असलेल्या बाबूरावांनी विनायकांच्या नावाचाच आग्रह धरला. पुढे तो आग्रह सार्थ ठरला हे विनायकाचे कर्तृत्व व बाबूरावाचे द्रष्टेपण याचाच परिपाक होय असे म्हटले पाहिजे.

हंस, नवयुग, न्यूहंस ह्या कंपन्यांच्या कालात बाबूरावांनी अनेक नवीन कल्पना कार्यान्वित केल्या. नव्या परंपरा रुजविल्या. नवे लेखक (बेडेकर—पहिला पाळणा) पुढे आणले. आणि बहुरंगी चित्रनिर्मिती दिली. बाबूरावाना अनेक बरे वाईट अनुभव आले (सर्वच क्षेत्रात येतात—कलेच्या अधिक) पण ते दिव्य पचवूनही त्यांनी चित्रव्यवसायाला अनेक 'अमृता'चे पेले दिले आहेत हे निर्विवाद.



हे काम करताना आणखीही एक गोष्ट त्यानी केली. ती आजच्या संदर्भात महत्वाची ठरावी. नवे चेहरे शोधले, सादर केले. 'मीनाक्षी'बद्दल विनायक फार साशंक होते. पण बाबूराव, नाईकाना विश्वास होता. शेवटी विनायकच तिची स्तुति करू लागला. शोभना समर्थ, शांता हुबळीकर ह्यानाही रुपेरी पडदा बाबूरावानीच दाखविला. बाबूरावांना मिळाली त्यापेक्षा अधिक चांगली साथ लाभली असती तर त्यांच्यातल्या साहसाला व जिद्दीला नवे फुलोरे आले असते असे मला वाटते.

बाबूराव अपघाताने नट झाले. पण मूकपटातला हा भगवान विष्णू बोलपटात मात्र गाजला तो यशस्वी खलनायक, चरित्र अभिनेता म्हणून! बाबूरावांची मुख्य भूमिका व्यवस्थापनाची असली तरी मूकपटाच्या जमान्यापासून त्यांनी प्रारंभ केला. रंगभूमीवर ते स्थिरावले. ५ मूकपटात त्यानी कामे केली. सैरंध्री (विष्णु) वत्सलाहरण (लक्ष्मण) दामाजी (विठु महार) बजरबट्टू (दिवाण) आणि जुलूम (राजबंधु) हे सर्व चित्रपट महाराष्ट्र फिल्म कंपनीने काढले होते. त्यानंतर बोलपटांचा जमाना सुरू झाला. बोलपटांपेक्षा मूकपटात अभिनयाला अधिक वाव होता असे एक मत त्यांच्या आत्मचरित्रात वाचनात आले. अभिनयातून सारी कथा सांगणे ही गोष्ट अवघड तर खरीच. त्या संदर्भात ते मत विचारार्ह खासच म्हणावे लागेल. पण बोलपटातून केवळ 'कथा' आल्या नाहीत. तर 'माणसे' आली. कॅरेक्टर्स आल्या, मने आली. समस्या आल्या. आनंद आणि हास्य, दुःख आणि वेदना आल्या. बोलपटाच्या जमान्यात बाबूराव पेंढारकर ह्यांनी अनेक 'ठसे' मागे ठेवले आहेत. ते 'खलनायक' म्हणून अधिक गाजले असले तरी नवी नवी आव्हाने स्वीकारण्याचा त्यांचा स्वभाव होता. म्हणूनच त्यांनी बेगुनाह, देवता, सुखाचा शोध, अमृत, मौसी, छत्रपति शिवाजी (शहाजीची भूमिका) मानाचे पान वगैरेत नायकाच्या प्रमुख भूमिका केल्या. पहिला पाळणातही त्यांनी नायकाचीच भूमिका केली. ब्रँड होणे कुणाही कलाकाराला आवडणार नाही. त्यांचा खलनायक अधिक गाजला. त्यांचे डोळे हे त्यांचे सामर्थ्य होते. त्यांची 'व्हिलनी' डोळ्यातून जणु अंगार ओकीत असे. त्यांच्या बोलण्यात ऐट होती. रुवाब होता. पौरुष होते. जयमल्हारमधील कल्लू बेरड, दामाजीमधील विठू महार, मानाचे पानमधील दौलू वस्ताद, अयोध्येचा राजामधील गंगानाथ महाजन, अमृतमधील कृष्णा चांभार, विक्रमादित्यमधील वेताळ भट्ट, अर्धांगीमधील झेंड् मारुतराव, जशास तसेमधील इनामदार, महात्माफुले, पुनवेची रातमधील पाटील, मी दारू सोडली—जहागिरदार ह्या त्यांच्या भूमिका अमर भूमिका म्हणून मी मानतो. नटाला निरीक्षण लागते. केवळ अनुकरण उपयोगी पडत नाही. बाबूरावानी आपल्या काही भूमिकामधल्या लकबी बोलणे, चालणे कसे उचलले त्याच्या हकीगती लिहून ठेवल्या आहेत. कृष्णा चांभारासाठी ते चांभाराच्या दुकानात जाऊन बसत होते. पण 'घरातले बोलणे वागणे' तिथे कसे कळणार ? त्यात ते यशस्वी झाले नाहीत असा अभिप्राय त्या चांभाराने दिला (तो बाबूरावानी नमूद केला ह्यात त्यांचे मोठे मन दिसते). दिसणे माणसाच्या हाती नसले तरी 'असणे' जर 'अस्सल' असेल तर अशी माणसे कलेच्या क्षेत्रात 'नोंदी' ठेवून जातात. ह्यातल्या कितीतरी भूमिका ह्या केवळ त्यांच्यासाठीच लिहिलेल्या होत्या असे वाटावे इतपत सजीवतेने ते त्या जगले. महात्मा फुले आणि कल्लू बेरड, सुखाचा शोधमधील आनंद आणि दौलू उस्ताद, धर्मवीर आणि झेंड् मारुतराव ह्या साऱ्या भूमिकांचे पिंड परस्पर विरोधी—विसंगत. पण बाबूराव नेकीने जगले त्या भूमिका. बाबूराव 'टच्' देऊन जगले. अभ्यास करून जगले. ते कल्पक निर्माते होते तसेच कल्पक नटही होते. ह्याचा प्रत्यय वरील भूमिकात तर येतोच. पण नाटकांच्या बाबतीत अधिक येत होता, हे मुद्दाम नमूद करतो. रंगभूमीवर ते तसे फार अल्प काळ होते. झुंजारराव, घनःश्याम, सुधाकर, लखजी

जाधव ह्यापुरतेच नाटयविश्व मर्यादित होते. पण त्या चारही भूमिकांना त्यांनी स्वत:चा असा रंग दिला. रूप दिले. रंगभूमीवर प्रेक्षक-नट यांच्यात जो सुसंवाद घडतो तो त्यांना महत्वाचा वाटला. एक नवा अनुभव म्हणून ह्याही क्षेत्रात काही करावेसे त्यांना वाटले. भावबंधनमधला त्यांचा घन:श्याम वेगळा होता. ते स्वत:च त्यासंबंधात म्हणतात, "लोक घन:श्यामाला खलनायक कां म्हणतात तेच मला कळेना. तो आपण होऊन कोणाशीही कोणत्याही प्रसंगी वाईट वागलेला नाही. इतकेच नव्हे तर बोलण्याचालण्यातील सभ्यताही त्याने कधी सोडलेली नाही. धनेश्वराची धंद्यातली सर्व लफडी कुलंगडी माहीत असूनही लतिका, प्रभाकर ह्यांच्याकडून त्याचा अपमान होईपर्यंत पैशाच्या अगर इतर कसल्याही लोभाने त्याने कधी त्याचा गैरफायदा घेतल्याचा प्रसंग नाटकात नाही. मग घन:श्याम दुष्ट कसा? तो बद्धिमान, सुसंस्कृत, सभ्य व तीव्र स्वाभिमानी माणूस आहे." उतारा मोठा आहे. सारा देत नाही. पण बाबूराव पेंढारकर यांच्या अभ्यासाची दिशा व ताकद (खोली) कळण्यापुरताच तो दिला आहे. ती कळेल. 'एकच प्याल्या'तील सुधाकराची भूमिका करतानाही रूढ चाकोरी त्यांनी स्वीकारली नाही. सनद रद्द केल्यानंतर सुधाकर तळीरामाबरोबर घरी येतो. त्यावेळच्या पोषाखापासून त्यांचे स्वतंत्र चिंतन सुरू होते. संवादातून जे सूचन होते ते ध्यानी घेण्याइतपत कुशाग्र बुद्धि बाबूरावांच्या ठिकाणी होती. ते स्वयंप्रज्ञ नट होते ह्याची साक्ष त्यांच्या रंगभूमीवरच्या चार कामातूनही मिळते. **"सुधाकर रामलालला दारूबद्दल जे लांबलचक भाषण ऐकवतो ते मी गाळतो. म्हणत नाही. दारूचे दुष्परिणाम दाखविणारे एवढे परिणामकारक भीषण नाटय प्रत्यक्ष घडत असता दारूच्या भयानकतेचे ते शब्दचित्र–मग ते कितीही बुद्धिमत्तेने, अफाट कल्पनाशक्तीने काढलेले असले तरी नाटयप्रयोगाच्या, गतीच्या व रसोत्कर्षाच्या**




# क्वचिदपि कुमाता न भवति!

**माणूस, एक स्वप्नाळू प्राणी, भूमीवर स्वप्न उभी करणारा. किती भव्य असतात हो त्याची स्वप्नं ! त्या स्वप्नांत तो धुंद असतो. शरीराचा अणुरेणु त्या 'स्वप्नशिल्पासाठी' कर्मयोगाची स्तोत्रे अहर्निश गात असतो. एक प्रकारची दिव्य चेतना इन्द्रियांना खेळवायला लागते. मनाच्या भव्य प्रासादात रोज नवं नवं शिल्प म्हणूनच आकाराला येत असतं. कलावंताचे महान चक्षू सौन्दर्याला बंदीवान करायला आकार शोधायला लागतात. शास्त्रांचे अधिकारी प्रलयकारी शक्तीला बांधण्यासाठी कटिबद्ध असतात. हजारो, लाखो, कोटयावधी हात त्या ध्येयपूर्तीसाठी काम करायला लागतात. काम ! काम ! काम ! थकेपर्यंत, निजेपर्यन्त, गात्रागात्रातल्या अखेरच्या शक्तिबिंदूपर्यन्त ही 'श्रमणारी लक्ष्मी' सारखी श्रमत असते. प्रसंगी जीवदान देऊन वाटचाल चालूच राहाते. उद्याच्या प्रसन्न जीवनासाठी यांच्या जीवनाचं खतपाणी सांडत असतं. अशी किती स्वप्नं इथं उभी राहिली आहेत. कितीदा साक्षात् विश्वकर्मा मनोमन लज्जित झाला आहे. आपल्याच मानसपुत्रांचा विजय पाहून तो आनंदला खरा ! पण कुठंतरी जिव्हारी लागलंय खरं ! तरी हा मनुज थांबला नाही. थांबणं हा त्याचा धर्म नव्हे. गति हे मानवी जीवनाचं गीत आहे. कर्तृत्वाचा श्वास आहे. अपरंपार आशेची पताका नेहमी खांद्यावर विसावते आहे. कर्तृत्व आणि चराचराला पराभूत करू पहाणारा आत्मविश्वास आज मानवाला अमानवी बनवतो आहे. इवल्याशा कुडीत अफाट ज्ञानाचा सागर हेलावतो आहे. ना आदि ना अंत ! त्यांच्या पराक्रमानी खरोखरीचं अस्मान ठेंगणं झालं आहे. तो आपल्या डोळ्यानी, स्वप्निल डोळ्यांनी ब्रह्मांडाला कवेत घेणारी स्वप्नं बांधतो आहे. आणि हाय ! हे काय झालं ? तो असा गडबडला कां ? ते कलात्मक डोळे निस्तेज कां झाले ? काळजीच्या पटलानी सदैव नूतनाकडे धावणारं ते विजिगिषु मन आज स्वत:भोवतीच फिरायला लागलं असं कां ? कां घडलं हे असं ?**

आज त्याच्या स्वप्नाला तडा गेला आहे. त्याच्या स्वप्नातल्या, कणखर देशावर बांधलेलं कोयनानगर आज उध्वस्त झालं आहे. जिथं पहाटेला लहानांच्या रडण्यानी जाग यायची, तिथं विवस्त्र वत्सलता दगड होऊन पडली आहे. हजारो कर्मवीरांच्या पदरवानं आसमंत जिथं निनादत असायचा तिथं शववाहिका निर्जीव फराटे धुळीत ओढीत धावताहेत. त्याना धावविणारा अजुनी चालवितो आहे यंत्र आपल्याच तोऱ्यात. अजुनी विजयाची नशा तरळते आहे त्याच्या डोळ्यात. कधीही क्षमा नसलेली

अनुक्रमणिका




ही एकमेव आगळीक तो युगायुगातून करीत आला आहे. इथंच उत्तुंग कळस बसविणारे हात उंचावायचे, तिथं आज पराक्रमाची कलेवरं लोळताहेत. मूर्तीमंत यश आपलंच मढं शोधीत या ढिगाऱ्यातून फिरत आहे. किती रे शोधशील ? यशापयशाची जोडी सदैव असायचीच, उजेडाला सावलीशिवाय आहे का रे मजा ? तू निराश होऊ नको. कधीतरी तू या निलाजऱ्या अपयशाला लाजविणार आहेस. दुर्दम्य आशावाद मात्र तुझ्या हातात हात घालून येतो आहे की नाही ? हे पहा.

संकटे येताहेत, येऊ द्यात. या म्हणावं, हजारोंनी या, मारा धडका, तुम्ही थकाल, नामशेष व्हाल, शिरी फुटून मराल, पण ही आत्मविश्वासाची ढाल तुटणार नाही. कदापि नाही.

"काय हटवुनि हटतो सागर हटेल एकीकडे !
उफाळेल तो दुसरीकडूनी गिळुनी डोंगरकडे !"

तुम्ही या. तुम्ही आलात की आमचे ध्येय एक होतं. सारे वैयक्तिक हेवेदावे लयाला जातात. मतभेद म्हणून नावाला शिल्लक रहात नाहीत. येते ती एकात्मभावाची स्फूर्ति पदरी बांधून येणारी ईर्षा ! साक्षात् कळिकाळाशी पंजा मारणारी ईर्षा ! अरे तुम्ही आम्हाला पोरके समजता ? म्हणून हतबल समजता ? मग संकटांनो, तुमच्या बुद्धिमत्तेची कीव करावी तेवढी थोडीच आहे. आमची धरतीमाता आम्हाला सांभाळील.

'हसता ! एवढं विकट हसायला काय झालं ? आज आम्हाला तिनं चपराक दिलीय् म्हणून वाटलं तर हंसा, वाकुल्या दावीत रहा. क्षणभराच्या समाधानात आनंदानं नाचा. पण आम्ही गरजू, 'ती आमची आई आहे' असू आम्ही अपराधी. ती अपराध पोटात घालणार आहे. नव्या पराक्रमाची जाणीव ती आमच्यात पेरणार आहे.

नाहीतरी भव्य भव्य स्वप्न पहायला आम्हाला कुणी शिकवलं ? तिनंच नाही का ? निसर्गाच्या पाळण्यात घालून, निर्झर संगीताच्या तालावर तिनंच सांजवाऱ्याची गीतं गाईली नाहीत का? आकाशीच्या ताऱ्यांशी खेळणी तिनंच आम्हाला दिली आहेत. अमर्याद प्रयत्नांच्या भातुकल्या खेळायला कल्पनांचं खेळणंपीठ तीच तर देते. या खेळात पंचमहाभूताना आमचे सौंगडी म्हणून तिनंच बोलावलं. ज्ञानाचा घोडा तिनंच बसायला दिला. तो जादूचा घोडा आहे. क्षणात स्वर्गात नेतो तर क्षणात पाताळात. हा खेळ पाहून तुम्हाला हसू येतय् होय ना ? कां आमच्या आततायीपणाला डोळे मोडताय् ? आम्ही या घोड्याला अगदी मोकेपर्यंत चाबी दिलीय् अगदी खरं आहे. आम्ही नाठाळ आहोत. पराक्रमाची ईर्षा आम्हाला आंधळं करते खरी. मग ही आमची आई आम्हाला चापट देते. अशी देते की जीव कळवळून जातो. देणारच, किती झालं तरी ती आमची आई आहे.

फार फार वर्षापूर्वी हिचाच एक सुपुत्र, संन्याशी असून विश्वसंसाराची अहोरात्र काळजी वाहाणारा, मानवी मनाची सूक्ष्म स्पंदनं हृदयात साठवणारा एक महान योगी-योगीवर, आमच्यासाठी एक मोठी गोष्ट सांगून गेलाय्. ती आम्हाला पटलीय्, आमच्या मनावर कोरली गेलीय्....

"कुपुत्रो जायेत । क्वचिदपि कुमाता न भवति !"

— बिंदुमाधव

---

दृष्टीने तितके आवश्यक वाटत नाही." सुधाकरच्या भूमिकेतले हे स्वतंत्र सूचन त्यांची चिंतनशीलता दाखविते. बाबूरावांची एकूण कला प्रकृति गंभीर होती. चिंतनशील होती. तळ शोधणारी होती. त्यातूनच त्यांची समर्थ कला जन्मली. पुढे पुढे त्यांचे बोलणे हे 'पृथ्वीराज कपूर' वळणावर गेले होते. 'शिवसंभव' मध्ये हे फार जाणवत असे. पण अभिनय समर्थ होता. उतारवयातही त्याला विलक्षण गति होती. चापल्य होते. त्यामुळे हा दोष संपादून जात असे.

बाबूरावांच्या नट-निर्मिता ह्या भूमिकांचा येथवर विचार केला. माझ्या दृष्टीने बाबूराव पेंढारकर यांची थोरवी आणखी एका बाबतीत अधिक होती. बाबूराव पेंढारकर हे कलंदर वृत्तीचे गृहस्थ होते. त्यांनी स्वतःही ह्या गोष्टीची कबुली मोकळेपणाने दिली आहे. मदिरा आणि मदिराक्षी, रेस आणि शेअर बाजारचा सट्टा (मित्रामुळे—कळत नसूनही पडले) ह्या साऱ्या गोष्टी त्यांनी केल्या. तीन लग्ने केली. अनेक 'अनुभव' घेतले. मदिरापानही निषिद्ध मानले नाही. परंतु हे सारे करताना त्यांनी ह्या गोष्टी आपल्या कलाजीवनाच्या आड कधी येऊ दिल्या नाहीत. दारू पिऊन आपल्या भूमिकांचा विसर पडलेले, काम बिघडविणारे अनेक कलंदर कलाक्षेत्रात आपण पाहतो. पण दारू पिऊनही बाबूरावांनी भूमिकांचा तोल जाऊ दिला नाही. स्त्रियानाही त्यांनी कलाजीवनाला बाध आणू दिला नाही. त्यांच्याबद्दल कलेच्या क्षेत्रात आग्रही भूमिका घेतल्या नाहीत. कला-क्षेत्र आणि व्यक्तिजीवन ह्यांची लक्ष्मणरेषा त्यांनी मनोमन मानली व तसे वागले. त्यामुळेच त्यांचा कलात्मक 'तोल' कधी ढळला नाही. बाबूरावांनी दारू पिऊन काम बिघडवले असे घडले नाही. मला ही त्यांची कमाई, हा बेधुंद जीवनातला 'कलात्मक संयम', हा तोल, ही निष्ठा महत्वाची वाटते. बाबूराव कमी बोलत. पण आत खूप डोंब उसळलेला आहे असे पाहणाऱ्याला जाणवत असे. त्यांचे आत्मचरित्र खूप 'बोलके' असूनही तसे बरेचसे 'अबोल'ही राहिले आहे. त्या मर्यादा भारतीय लोकजीवनाच्याच मर्यादा आहेत. पण बाबूराव त्या मानतात, ते 'विकेड विकेड वेज' लिहीत नाहीत संयम पाळतात हेच मला महत्त्वाचे.

(पृष्ठ ६१ वर पहा)


सर्व बळ एकवटून...एकीने...जिद्दीने खेचून घेऊ.
परिश्रमांची पराकाष्ठा करून...प्रयत्नांचे समाधान व यशाचा निर्भेळ आनंद पदरी पाडून खेचत रहाण्याचे तंत्र आम्हाला सुरुवातीपासून साध्य झाले आहे.
'स्वस्तिक'ला रबर धंद्यातील अग्रस्थान प्राप्त होण्यापूर्वी—
एका छोटया शेडमध्ये धंद्याची अल्पांशाने सुरुवात ...२५ वर्षांचा प्रदीर्घ अनुभव...तज्ञांचा सखोल अभ्यास...मालाची विक्रीपूर्व चाचणी...आणि याहीपेक्षा अधिक म्हणजे मनातील जिद्द.
सहाजीकच आमच्या रबरी उत्पादनांचा दर्जा सर्वोत्कृष्ट आणि अजोड असणारच.
'स्वस्तिक'ची कांही रबरी उत्पादने—
होज पाइप्स, रबरी बुचे, ऑटो पार्टस्, ऑईल सील्स्, ॲडीझीव्हज्, हवामानविषयक बलून्स्, लॅटेक्स उत्पादने-उदा. हातमोजे (शस्त्रक्रीयेसाठीं, औद्योगिक व घरकामासाठी), रबर गमबूटस् आणि कॅन्वॅस बूटस् व इतर विविध पादत्राणे.
स्वस्तिक
स्वस्तिक रबर प्रॉडक्ट्स लिमिटेड, खडकी, पुणे-३.
TOM & BAY SR/8685-M




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास






—भास्कर उत्तरवार

***दृश्याला पडलेली चौकटही सरते. कॉंपोझिशन्सही बदलतात. अर्थ बदलत राहतात. दरवेळी वेगळंपण येतं. कॅमेरातलि रिफ्लेक्स मिररवर येतं तसं.***

**एक** साधी खिडकी. चारी बाजूस लाकडी फ्रेम असलेली आणि मध्यात लोखंडी पट्ट्यांनी भूमितीय आकृत्या काढलेली. लाकडी फ्रेम्सना फिकट पिवळा रंग आहे. बरेच दिवस झाले लावल्याला. विटला आहे. बारकाईनं बघितल्यास रंगविणाऱ्याचा निष्काळजीपणा दाखविणारे रंगाचे फराटे दिसतात. मध्येच एकटा दुकटा ब्रशचा तुटलेला केस रंगात अटकून पडलेला दिसतो. वरच्या अंगाला दोन्हीकडे दोन खिळे ठोकलेले आहेत. त्याला बाजारात मिळणारी कर्टन–रॉड ताणून अटकवली आहे. रॉड गंजली आहे. टांगलेला पडदा विटलेला आहे. बऱ्याच दिवसात धुतलेला नाही. हा पडदा बाजूला सारला की पुढील दृष्य दिसतं.

तसं सर्वसाधारणच. मुंबईतल्या कुठल्याहि फ्लॅट किंवा ब्लॉक नामक वास्तूला असलेल्या खिडकीतून दिसतं तसं. समोर मुलांना खेळण्यासाठी लहानसं ग्राऊंड. त्यापलिकडे एकाला एक लागून असलेल्या बिल्डिंग्ज्. प्रत्येक मजल्यावरील ब्लॉकला असलेल्या गॅलऱ्या. कठड्यावर ठेवलेली खालील डालडाच्या डब्याला आधार म्हणून वाढलेली झाडे, त्यावर आलेलं एखाद दुकटं फूल. कठड्याशी ओठंगून उभी राहणारी कुठलीहि एक व्यक्ति, अनोळखी शरीराची, निरभिप्रेत नजरेची.

दृष्य तसं निरर्थकच. पण खिडकीतून बघितलं की त्याला चौकट येते. त्याचा एक फोटोग्राफ बनतो. आणि त्याला एक स्वतःचा अर्थ येतो. ह्या अर्थाशी मी मग चाळा करीत राहतो. आजूबाजूला सरतो. त्या सरण्याबरोबरच ह्या दृष्याला पडलेली चौकटहि सरते. कॉंपोझिशन्स बदलतात. अर्थ बदलत राहतात. दरवेळी वेगळेपण येतं. कॅमेऱ्यातील रिफ्लेक्स मिररवर येतं तसं. कॅमेरा हलवला म्हणजे मिररवरील दृष्यहि हलतं आणि वेगळं दिसायला लागतं. तसं.

"बरं का हो?" मागून आवाज येतो.

"काय?"

"आज मुलांच्या शाळेत गेले होते."

"मग?"

"मुलांच्या अभ्यासाची प्रगति ठीक

आहे पण गणिताकडे अधिक लक्ष द्या असं प्रिंसिपॉल म्हणत होते."

"होय?"

"घरची कामं दिवसभर उपसून थकायला झालं असतं मला. संध्याकाळी उत्साहच राहत नाही."

"होय ना."

"तुम्ही घेत चला अभ्यास मुलांचा रोज."

"घेईल की!"

"तुमचं लक्ष कुठंय्?"

"तुझ्या बोलण्याकडे."

"उगाच काही तरी सांगू नका. नुसतं होय आणि नाही असं चाललंय् तुमचं."

"तूं बोलतेस. ऐकतो मी."

"उगाच काही तरी सांगू नका. काय बघताय् हो एवढं?"

"विशेष काही नाही. सहज."

"तेल महागलंय्. साखरेचा भाव पाच रुपये झाला किलोला."

"फार भडकलीय् महागाई हल्ली."

"घरी खर्चाचा मेळ बसवता बसवता नाकी नऊ येतात माझ्या."

"नाकी नऊच यायचे. आठ आलेले ऐकलेय् कधी?"

"तुम्हाला चेष्टा सुचते. परवा मुलांचे युनिफॉर्मस् घेतलेत तर सदतीस रुपये झालं बील."

"होय?"

समोरून सूर लहरत येतात. 'जिवलगा राहिले रे दूर घर माझे......" कुणाकडे तरी रेकॉर्ड-प्लेअर आहे. मराठी गाणी वाजत असतात. रेकॉर्ड खराब झाली आहे. जिवलगा जिवलगाची सतत उजळणी होते. कुणी तरी स्टायलस सरकावून देतं. गाणं पुढं चालू राहतं. मी पवित्रा बदलवतो.

संध्याकाळी पुढल्या बिल्डिंगज्मधील दिवे लागतात. चौकटीतून अनेक लहान लहान प्रकाशमय चौकटी दिसतात. त्या प्रकाशातून आकृत्या हलतात. कुणी दुसऱ्या दिवशीसाठी घुतलेलं शर्ट हँगरवर टांगून वाळू घालताना दिसतो. कुणी अंथरूण घालताना. कुणी पट्ट्याचा पायजामा आणि बनियन घालून इकडे तिकडे फिरत सिनेमाच्या गाण्याची लकेर मारताना दिसतो.

"आजच्या पेपरमधली बातमी वाचलीत काय?"

"कोणती?"

"पुरुषानं ऑपरेशन करून घेतल्यास त्याला एक ट्रांझिस्टर बक्षीस मिळणार म्हणे."

"अस्सं?"

"आपल्याला तीन मुलं आहेत."

"पण आपल्याकडे ट्रांझिस्टर आहे की!"

"इश्श! तुम्हाला ट्रांझिस्टरसाठी ऑपरेशन करून घ्या असं नाही म्हणत. आपल्याला तीन मुलं पुरेशी झालीत; नाही?"

"होय ना."

कुठल्या तरी ब्लॉकमध्ये सुरू असलेला तबल्याचा रियाझ ऐकू येतो. पेटीवर धरलेल्या लेहऱ्याचा एकच एक आवाज तबल्यापेक्षाहि जोरात ऐकू येतो. कोणत्या रागात आहे कुणास ठाऊक पण अवरोहांतील कोमल निषादावरची हरकत मनाला सलून जाते. त्रितालातलं आवर्तन सुरू असतं. दिवा लागला की न चुकता हा रियाझ सुरू होतो.

समोरच्या ब्लॉकमधील प्रौढ व्यक्ति आरामखुर्चीवर वर्तमानपत्रे चाळीत असलेली दिसते. पुढच्यातल्या खुर्चीवर बसलेल्या पत्नीशी बोलत. शब्द ऐकू येत नाहीत. पण मंद हसणं ऐकू येतं. त्या हितगुजावर सुखाची साय तरंगलेली दिसते. एकच मुलगी. तिचं सामायिक कौतुक चाललेलं असतं.

"आपली कार्टी फारच वाह्यात झालीत हो. परवा मधल्या त्या शेजारच्या मुलीला तूं माझी बायको आहेस असं म्हणाला."

"होय?"

"होय काय? तेवढ्यावरच थांबलं नाही कार्टं. आता तुला बाळंत व्हावं लागेल असं म्हणाला गधडा तिला. त्या बाई काय भडकल्या माहित आहे का?"

"काय?"

"म्हणाल्या ह्या वयात एवढं तर पुढं काय करील!"

"काय करील?"

"डोंबलं तुमचं नि माझं! जरा लक्ष द्या मुलांकडं. नीट वळण लावा त्यांना."

"लावू की!"

"कधी? तुमचं लक्ष कुठं असतं घरात. बाकीचे लोक बघा कसे जपतात मुलांना. प्रत्येक गोष्टीकडे जातीनं लक्ष देतात. तुमचं सारंच जगावेगळं. एकदा तरी चौकशी करता का नीट घरात?"

"तूं आहेस ना. मला काळजी नाही."

पुढील खिडकीतून एक व्यक्ति दिसते. तावातावानं काही तरी बोलत आहे. मुलगा मान खाली घालून उभा आहे. बहुधा त्यानं केलेल्या गुन्ह्याबद्दल त्याची हजेरी घेतली जात असावी. त्याची आई बाजूला उभी आहे. ती सारखी काही तरी सांगत आहे. ती व्यक्ति अधिकच भडकत आहे. त्या मुलाच्या कानशिलात मारलेली दिसते. रडण्याचा आवाज ऐकू येत नाही पण चपराकीचा येतो. बरीच जोरात लागलेली दिसते......

"काल बाबांचं पत्र आलंय्."

"काय?"

"रमेशच्या लग्नाची बोलणी चाललीत म्हणून."

"अस्सं!"

"मी लग्नाला जाणार त्याच्या. यावेळी काही सबब ऐकणार नाही मी. भावाच्याच लग्नाला गेले नाही तर काय म्हणतील सारे नातेवाईक?"

माणसापेक्षा प्राणीच अधिक आवडतात. गेले दोन दिवस मारे उरापोटावर खेळवत होता त्याला. तेवढ्याच वेळात माझ्याशी बोलला असता तर?"

"तुझ्याशी पण बोलतो की!"

डावीकडील बिल्डिंगमधील दुसऱ्या मजल्याच्या उजवीकडील ब्लॉकमध्ये गॅलरीवर पाय ठेवून कुतुहलानं बाहेर बघत असलेला कुत्रा दिसतो. जरा काही झालं की तो घरातून धावत येतो, कठड्यावर पाय ठेवतो आणि भुंकतो. गळ्याला पट्टा आहे. रंग स्वच्छ पांढरा. भुंकताना जोरजोरानं मानेला झटके देतो. आपण भुंकतो आहो, हे घरातील अन्नदाते बघत आहे ह्याची खात्री करून घ्यायला वारंवार माने मान वळवून बघतो. पुन्हा भुंकतो. कुणी तरी आतून येऊन त्याच्या डोक्यावर थोपटतं, त्याला उत्तेजन येतं. ग्राऊंडमधील वेडावणाऱ्या मुलांवर तो अधिकाधिक भुंकतो. मग आत जातो. घरातील व्यक्तीच्या पायाभोवती घोटाळतो.

मी हलतो. चौकट हलते. उजव्या बाजूची सर्व बिल्डिंग दिसत नाही. पडदा बाजूला सारतो पण सरत नाही. गंजलेल्या रॉडमध्ये तो रुतून बसलेला असतो. मग तो पडदाच वर धरून ठेवतो.

"अहो मसाला संपला घरातला. परवा तुम्ही आणलेला काही तरीच निघाला. बेडेकरांकडे जाऊन, गोडा मसाला हवा असं सांगा, म्हणजे देतात बरोबर. सवाशे ग्रॅम आणला की पुरतो महिनाभर."

"बरंय्."

"आणि, होय, मोरी तुंबतेय् बाथरूमची सारखी. खरकटं पाणी वाहून जात नाही नीट. कंप्लेंट लिहून या. जाताना पट्ट्याचा पायजामा घालून जाऊ नका. फाटलाय् तो. पँट घाला नीट."

"होय."

उजवीकडील आडव्या बिल्डिंगमधून एक गोरटेली व्यक्ति बाहेर येते. व्यक्तिमत्व उमदं आहे. सैनिक अधिकाऱ्यासारखे मिशाचे आकडे वळवलेले. मोठ्या डौलात पाऊल टाकीत पुढे येते. मग उभ्या उभ्या खिसे चाचपते. पँटचे खिसे चक्क उलटवून बाहेर काढते. ऐकू येतं. "ओऽह्! धीस गॉड्डॅम मेमरी!" मग ओरडते.

"इब्राहिम, आय फरगॉट माय ब्लडी वॅलेट. थ्रो ईट!" गॅलरीतून इब्राहिम पाकीट टाकतो. ती व्यक्ति झेलते आणि मग लांब लांब टांगा टाकीत निघून जात.

डावीकडील इमारतीतून चारपांच स्त्रिया निघतात. बोललेलं स्पष्ट ऐकू येत नाही पण ओठांमधून निघणारे सीत्कार चार पांच घंटांच्या आवाजासारखे किणकिणतात. साऱ्यांचे कपडे स्वच्छ आहेत, नाजूक आहेत. मधल्या बाईच्या ब्लाऊजला बाह्या नाहीत. पलीकडल्या बाईच्या हातात खड्यांची काकणं आहेत. हात हलला की इंद्रधनुष्याच्या लकेरी उठतात. एकीच्या हाती काळीभोर पर्स आहे. तिच्या दुपेडी वळवलेल्या आंबाड्यात खोचलेल्या ब्रूचचे मोती पाणीदार वाटतात. साऱ्याच

[पृष्ठ ३० वर पहा]








एक बेताल चित्र

## दादरा (खालील 'सूरावट')

चोरून पिणारे भोळे 'कंट्री'च्या दोस्तीला शरण जातात,
मजबूरीत. चाळीच्या नाक्यावरचा नक्षा पोलिस
हप्त्याने खुलतो, पैशाच्या तालांवरील पुच्छांसारखा.
अशा वेळी सोड्यात मिसळून तुला पितात,
ती माझी 'सूरावट' सहा मित्रांची असते.

'काम' झाल्याशिवाय पोलिस येत नाही; मग नशा
धुंदफुंद होते. बेबंद झालेला माझा फुकटा दोस्त
एका बाटलीत भागत नाही; आणि पुन्हा तर्र होऊन
झिंगू लागतो, तुझ्या मोहिनीच्या धुंदीखाली.
तेव्हा डोळे लालगुंजा बनतात; तुझा अर्थ अमृतासम असतो;
त्याला भट्टीत उकळविणारे 'तीर्थंकर' हात माझे असतात;
ती माझी 'सूरावट' सहा मित्रांची असते;

पोलिस श्वानांसारखा वास काढीत येतो;
आम्हालाहि चढलेपणाचे अवसान असते; बाटलीबाटलीला
रितेपणाचा शाप असतो; जेव्हा तुझे
'आशिक' मनातल्या मनात जगावर वैतागतात...
तेव्हा त्या अभाग्यांना दादराखाली हातभट्टी हवी असते.

—ह. शि. खरात

"मग जा की!"

"हो! जाकी! तुम्हाला नुसतं तोंडानं म्हणायला काय होतं? सारा पगार माझ्या अंगावर टाकता आणि खर्च कर म्हणता. महिन्याच्या शेवटाला फुटकी कवडी उरत नाही. जायला पैसे कुठले आणू?"

"मग नको जाऊस..."

उजवीकडल्या बिल्डिंगच्या तिसऱ्या मजल्यावरच्या खोलीत दोन तीन तरुण मुलं दिसतात. पायजामा आणि बनियन-मध्ये घरभर फिरतात. बसतात. गॅलरीत येऊन उभी राहतात. परत आत जातात. स्त्रीचा हात घरातून फिरलेला दिसत नाही. कॅलेंडर्सवर स्त्रियांचीच चित्रे आहेत. दुसऱ्या बाजूला एक मुसलमान भाडेकरू आहे. संध्याकाळ झाली की गॅलरीत चटई टाकून नमाज पढताना दिसतो. मांड्या मुडपून बसतो. जमिनीला डोकं टेकण्याची आणि उचलण्याची क्रिया तालबद्ध सुरू असते.

"घरचे सारे कप फुटलेत हो."

"होय?"

"परवा बाजारात गेले होते. फारच महागडे आहेत मेले."

"आजकाल सारंच महाग झालंय."

"तरीहि चांगल्या कपबश्या आणल्या मी स्वस्तात."

"अस्सं?"

"तर! त्याच्याजवळ तडा गेलेले तीन चार जोड होते. भाव कमी करायला तयार नव्हता. अखेर अर्ध्या किमतीत आणले. अर्धा तास घेतलान् मेल्यानं देण्यापूर्वी. आणि एक ताकाचं भांडं पण आणलं. झाकणच नव्हतं. पाव किमतीत दिलं. कुणी आलं तर वाढायच्या कामी येईल."

"छान केलंस."

"आणि हो! दादरला पितळी भांड्यांना चांगलं स्टेनलेससारखं पॉलीश करून देतात म्हणे. घरी स्टेनलेसची भांडी नाहीत. काही डब्यांना आणि ताटांना तसलं पॉलीश करून आणा."

"आणू की!"

पुढल्या बिल्डिंगच्या तळमजल्याच्या डावीकडील ब्लॉकमधील गृहस्थ खिडकीत गुंतवून वाढवलेली भली थोरली मनीप्लँट कैचीनं कातरून नीट करीत आहे. चकाकत्या कैचीची पाती क्षणार्धं झळकतात. वेलीचे तुकडे तुटून पडतात. मुळं गोळा करून परडीत टाकतात. खिडकीतून घरात वरंच आधुनिक सामान असल्याचं दिसतं. बाई जरा स्थूलपणाकडे झुकली आहे. कपडे नेहमी चांगले दिसतात. स्वच्छतेची आवड दिसते. तारेवर वाळत घातलेले कपडे टेरिलीनचे असतात. टॉवेलसुद्धा वांवे डाइंगचा, मोठा. तिच्या साड्यांवर गार्मेंटच्या ड्राय क्लिनिंगची चमक असते. टाय बांधायलाहि तो गृहस्थ पांच मिनिटे घेतो. आणि टायपीनवरला खडा तेवढ्या-तहि चमकून जातो. घरातून चहाचा कप येतो. कैची बाजूला ठेवून तो कपानंच चहा घेतो. कॉफी हाऊसमध्ये कॉफी घेतात तसा. क्रॉकरीचं पॉलीश इतक्या लांबूनच झळाळत असल्यासारखं वाटतं.

"परवा कसलं ते घाणेरडं मांजराचं पिलू घरी घेऊन आलात हो?"

"कां चांगलं आहे की."

"होय चांगलं! घाणेरडं मेलं! रात्री-तून साऱ्या किचनभर हगून घाण करून ठेवली. नाक मुठीत धरून काढावी लागली मला. सकाळी उठल्याबरोबर मेल्याच्या पेकाटात लाटणं घालून हाकून लावलं."

"अरेरे!"

"अरेरे काय? नाही तरी तुम्हाला




# सतारीचे बोल

—प्रा. मधुकर वासुदेव धोंड

**केशवसुतांची 'सतारीचे बोल'** ही कविता त्यांच्या उत्कृष्ट कवितांत गणली जाते. रात्रीच्या अंधारात विषण्ण वृत्तीने हिंडणाऱ्या कवीस एका घराच्या खिडकीतून सतारीचे बोल ऐकू येतात, ते ऐकता ऐकता त्याच्या विषण्णतेचे करुणेत, करुणेचे आशेत, आशेचे उदात्ततेत, उदात्ततेचे प्रेमात, असे भावांतर होत होत अखेरीस त्या प्रेमाचे शांतीत पर्यवसान होते, आणि तो घरी परतून स्वस्थ चित्ताने झोपी जातो, अशी कथा या कवितेत आहे. या कवितेत संगीताचा प्रभाव दाखविला आहे, असे बहुतेक टीकाकारांचे मत आहे. या कवितेचा आशय एवढाच मर्यादित आहे काय? तसे असेल तर विषण्णता, करुणा, आशा, उदात्तता, प्रेम व शांति या भावांचा परस्परसंबंध काय? या क्रमाला अर्थ कोणता?

ही कविता संगीतविषयक नसून संगीताच्या आश्रयाने कवीला एक वेगळीच अनुभूती व्यक्त करायची आहे, असे मानून या कवितेचे अर्थ लावण्याचे प्रयत्न झाले आहेत. **'जड हृदयीं जग जड हे याचा। प्रत्यय होता प्रगटत साचा'** या पंक्तींच्या आधाराने काहींनी ही कविता तत्त्वचिंतनात्मक मानली आहे. एका टीकाकाराने तर ही समाजसुधारणाविषयक कविता मानून तिची फोड करून दाखविली आहे. पण त्यांचे भाष्य समाधानकारक वाटत नाही. आपण या कवितेचा अर्थ नव्याने लावण्याचा प्रयोग करू या.

शब्दांचा अर्थ संदर्भाने निश्चित होत असतो. कित्येक वेळा शब्द ज्या कवितेत आला आहे तिच्या संदर्भात त्याचा अर्थ निश्चित करता येतो, तर कित्येक वेळा त्याचा अर्थ त्या कवीच्या समग्र काव्याच्या संदर्भातच निश्चित करता येतो. प्रस्तुत कवितेत आलेले सूर, वाद्य, तम, द्युती, नक्षत्र, स्वर्ग, सदन इत्यादी शब्द किंवा त्या अर्थाचे दुसरे शब्द केशवसुतांच्या इतर कवितांतही आलेले आहेत. त्या त्या ठिकाणी या शब्दांचे वाच्यार्थ घेऊन चालत नाही. उदाहरणार्थ, **'मघला उजेड तिमिरीं दडे'** या पंक्तीतील 'उजेड' व 'तिमिर' या शब्दांचे अर्थ 'प्रकाश' व 'काळोख' हे घेऊन कसे चालेल? काळोखात प्रकाश कसा दडून बसणार? इथे 'तिमिर' हा शब्द दुःख, अज्ञान, निर्बुद्धपणा, निराशा, अगतिकता इत्यादी अनेक भाव सूचित करणारा आहे आणि 'उजेड' हा शब्द त्यांच्याशी विरोधी असे भाव सुचविणारा आहे. म्हणजे 'उजेड' व 'तिमिर' या हे भाव व्यक्त करणाऱ्या प्रतिमा आहेत. तीच गोष्ट वरच्या इतर शब्दांची. हे शब्दही प्रतिमारूप आहेत. या प्रतिमा विशिष्ट अर्थाने त्यांच्या कवितांत वारंवार येत असल्यामुळे त्या प्रतीकात्मक झालेल्या आहेत. हे शब्द याप्रमाणे प्रतिमारूप व प्रतीकात्मक आहेत, हे लक्षात घेतल्यानेच या कवितेचा उलगडा होऊ शकतो.

प्रस्तुत कवितेत सूर, ध्वनी, गती असे संगीतविषयक शब्द आले आहेत. केशवसुतांच्या कवितांत, गा, गीत, गाणे हे शब्द जेव्हा जेव्हा येतात, तेव्हा तेव्हा त्यांना काव्यच अभिप्रेत असते. उदाहरणार्थ, **'द्या उत्तेजन हो कवीस न करा गाणें तयाचें मुकें'** ही प्रसिद्ध ओळच पहा. गाण्याप्रमाणेच वाद्याचीही प्रतिमा त्यांच्या कवितांत काव्याच्या संदर्भातच येते. त्यांच्या सुप्रसिद्ध **'तुतारी'** कवितेतील तुतारी हे वाद्य नसून जागृती, उत्साह, युयुत्सुवृत्ती उत्पन्न करणारी कविता, याचेच ते प्रतीक आहे.

**दूर कोठें एकला जाउनीया, एकतारी आपुली घेउनीया**
**स्वेच्छ होतों छेडीत ती मनाला, दुःखिताला आराम व्हावयाला.**

यातील एकतारी हेही वाद्य नसून स्वतःशीच स्वतःची दुःखे गाणारी अप्रकट कविता आहे. प्रस्तुत कवितेतील सतारीचे बोल हेही याच दृष्टीने वाद्याचे बोल नसून हृदयाला पीळ पडल्यामुळे त्यातून निघालेले बोल आहेत.



अनुक्रमणिका






> केशवसुतांसारखे महान् कवी, आणि त्यांच्या काव्य-रचनेतील शब्दसंपदा यांचे हे एक आगळे मूल्यांकन. ....रसिकाना खासच विचार करावयाला लावणारे....

**तारा ताणिलियावरी पिळुनिया खुंटयांस वाद्याचिया**
**त्यांच्यांतून अहा। ध्वनी उमटती, जे गोड ऐकावया।**

या पंक्तींत केशवसुतांनी ही प्रतिमा स्पष्ट केली आहे. **'सतारीचे बोल'**मध्ये दुसरा कोणीतरी सतार वाजवीत होता, असे केशवसुतांनी म्हटले असले, तरी कवी स्वतःशीच जो संवाद करतो, तोच त्याना इथे अभिप्रेत आहे. याच आत्मसंवादाकरिता केशवसुतांनी दुसऱ्या कोणाची तरी योजना इतर कवितांत देखील केलेली आहे. **'तुका म्हणे होय मनाशीं संवाद। आपुलाचि वाद आपणांशी'** यासारखेच त्यांतील वादसंवाद आहेत. **'दूर कोठें एकला जाउनीया'** या कवितेत केशवसुतांनी,

**हृदय आत्म्याला जधी खेळवीते, हृदय आत्म्याला जधी आळवीते**

असे या संवादाचे स्वरुप स्पष्टच केले आहे.

संगीत व सतार या दोन प्रतिमांचा आशय अशा रीतीने निश्चित करून घेतला, की **'सतारीचे बोल'** ही कविता संगीत-विषयक नसून काव्यविषयक आहे, हे स्पष्ट होते आणि त्या दृष्टीने ही कविता वाचली, की तिचा आशय विनायास उलगडत जातो.

**'सतारीचे बोल'** या कवितेची सुरुवात

**काळोखाची रजनी होती, हृदयीं भरल्या होत्या खंती**

अशी आहे. या खंती कोणत्या? या खंती लौकिक जीवनातील दुःखामुळे उत्पन्न झालेल्या नाहीत.

**अमुचा पेला दुःखाचा, डोळे मिटुनि प्यायाचा**

हे केशवसुतांना ठाऊक होते. त्याची त्यांना खंत नव्हती.

**पितां बुडाशीं गाळ दिसे, त्या अनुभव हें नांव असे।**
**फेकुनि द्या तो जगावरी, अमृत होउं तो कुणातरी.**

हीच त्यांची इच्छा होती; आणि तो कुणालाही अमृत होत नव्हता, हेच त्यांचे दुःख होते. **'दिव्य ठिणगी'** या कवितेत ते म्हणतात,

**ज्याला मी मुकलों विषाद मजला त्याचा मुळींही नसे**
**जें पृथ्वीवर आणिले जन तया धिक्कारिती हा कसे!**

**'सतारीचे बोल**मधील खंत देखील याच स्वरूपाची आहे, हे

**जड हृदयीं जग जड हें याचा, अनुभव होता प्रगटत साचा**

या पंक्तींवरून स्पष्ट होते. जग निर्बुद्धपणे आपल्या काव्याचा अव्हेर करते, हाच जगाच्या जडत्वाचा प्रत्यय आणि यामुळेच त्यांचे हृदय जड झाले होते. या अवहेलनेनेच ते,

**काय करावें, कोठें जावें, नुमजें मजला की विष खावें**

असे अगतिक होऊन रस्त्यात हिंडत होते. इथे अगतिक होणे, रस्त्यात हिंडणे, विष खाणे या कल्पना देखील केवळ वाच्यार्थाने घ्यायच्या नाहीत. कविता करणे हाच कवीचा मार्ग, तोच त्याचा जीवनहेतू. **'रुष्ट सुंदरीस'** या काव्यदेवतेस उद्देशून लिहिलेल्या कवितेत ते म्हणतात,

**प्रीतिविषय तो जर का परका प्राण्याला जाहला**
**तयाचा जन्महेतु खुंटला**
**विषण्ण मग तो विषवृक्षाची फळें**
**सुधारसाची मानुनि गिळिलचि बळें**

काव्यरचना थांबणे हीच कवीची आत्महत्या. जगाने केलेल्या उपेक्षेमुळे ते या अंतिम विचारापर्यंत आलेले आहेत. इतक्यात त्यांना सतारीचे बोल ऐकू येतात. हे सतारीचे बोल म्हणजे त्यांच्या हृदयाचेच बोल. ते त्यांना ऐकायचे नसतात. पण हृदयाची आळवणी चालूच असते. काही वेळाने ते ते बोल ऐकू लागतात आणि,

**—इतुक्यामाजी करुणा, रसपूर्ण गती माझ्या श्रवणा**
**आकर्षुनि घे, हृदय निवालें, तन्मय झालें, द्रवलें; आलें**
**लोचनांतुनी तोय कितिकदां, ऐकत असतां दिड दा, दिड दा।**

असे विषण्णतेचे करुणरसात भावांतर होते. हे कसे झाले?

माणसावर आपत्ती येतात आणि तो दुःखी होतो. त्या दुःखाने तो आत्महत्येसही प्रवृत्त होतो. पण त्या दुःखाचा तो काहीशा अलिप्तपणे—केशवसुतांच्या शब्दात स्ववशता विसरून'—विचार करू लागतो, तेव्हा ते दुःख अपरिहार्यच आहे, हे त्याला कळून येते. तो त्या दुःखाचा स्वीकार करतो आणि दुःखाचे करुणरसात भावांतर होते.

या दुःखाचा स्वीकार केल्यावर कवीच्या मनात काही उत्तेजक विचार येतो. त्याला कुणीतरी आपल्या खांद्यावर हात ठेवून,

**धीर धरी रे धीरापोटीं, असतीं मोठीं फळें गोमटीं**

असे आश्वासन देत आहे, असा भास होतो.

असाच एक प्रसंग **'दूर कोठें एकला जाउनीया'** या कवितेतही आहे.

**आजवरी बहु मनोभंग झाले, बहुत आशांचे प्राण निघुनि गेले**

अशा उद्विग्न मनःस्थितीत कवी निर्जनात एकटाच बसला असता, आकाशातील तारका त्याला 'बंधू' म्हणून हाक मारते आणि माझ्याप्रमाणेच तुझ्यातही दिव्यता आहे, म्हणून तू माझा भाऊच आहेस, असे नाते लावून,

**नको ऐसें रे वदूं बंधुराया, म्हणुनि लागे ती मला आश्वसाया.**
**तुझ्या दिव्यतापुढे जग भिकारी, कासया हो खिन्नता दूर सारी.**

असे त्याचे सांत्वन करते. **'सतारीचे बोल'** या कवितेतील आश्वासनही याच स्वरूपाचे दिसते. कारण लगेच कवी वर आकाशाकडे बघू लागतो.

**वरती मग मी नजर फिरविली, नक्षत्रें तों अगणित दिसलीं.**

ही नक्षत्रे कोणती?

केशवसुतांच्या कवितात नक्षत्रांची प्रतिमाही कवीच्या संदर्भातच आलेली आहे. त्यांच्या **'आम्ही कोण'** मधील **'आम्हाला**





अनुक्रमणिका



गणिका

**बाई ! ! पाउल माझे चुकले.**
**त्यांचे पौरुष बघून नकळत अवखळ मन बावरले.**
**आगडबीच्या बाजू वर... काडी परि चुकून घसरले.**
**प्रीत पेटता कापुरवाणी... ज्योतिर्भूत उजळले.**
**'त्यांच्या' वर बाजू परि परिणामी काहीच न दिसले.**
**जिणे काळतोंड्या जळक्या काडीचे नशिबीं उरले**
**शरीर... वजनाच्या यन्त्रागत नित नव-भारा रुळले**
**बाईऽऽ पाउल माझे चुकले.**

**—'फाशालता'**

**वगळा—गतप्रभ झणीं होतील तारांगणें'** ही ओळ तर प्रसिद्धच आहे. **'दूर कोठें एकला जाउनीया'** या कवितेत तारका कवीशी भगिनीचे नाते जोडते, तर **'कवि आणि धूमकेतु'** या कवितेत महाकवीला धूमकेतूची उपमा दिलेली आहे. कवीच्या दिव्यत्वावर, तेजावर केशवसुतांनी नेहमीच भर दिलेला आहे. प्रस्तुत कवितेतील नक्षत्रे म्हणजेच मोठे कवी. त्यांच्याकडे नजर जाताच कवीला आपले त्यांच्याशी असलेले नाते लक्षात येते. तो जगातील अंधार विसरतो आणि **'तम अल्प, द्युति बहु'** असा प्रत्यय येताच आकाशातील तेजानेच वेडावतो. **'दूर कोठें एकला जाउनिया'** ही कविता या विचाराशीच संपलेली आहे.

**तुझ्या दिव्यत्वापुढे जग भिकारी**

असे तारकेकडून आश्वासन मिळताच,

**खेद गेला, आनंद मनीं आला, समाधानी मी पातलों घराला**

असा कवी घरी परततो. पण 'सतारीचे बोल' ही कविता इथेच थांबत नाही. या कवितेत कवी नक्षत्रांशी असलेले आपले नाते जोडून घेण्याचा प्रयत्न करतो आणि त्या प्रयत्नातच त्याला,

**तों मज गमलें विभूति माझी, स्फुरत पसरली विश्वामाजी;**
**दिक्कालासही अतीत झालों, उगमीं विलयीं अनंत उरलों;**
**विसरुनि गेलों अखिलां भेदां, ऐकत असतां दिड दा, दिड दा।**

असा अलौकिक अनुभव येतो. नक्षत्रांशी—मोठ्या कवींशी—नाते जोडण्याच्या प्रयत्नात कवीची विभूती विश्व व्यापून टाकते. मोठ्या कवींची प्रतिभा दिक्कालाला ओलांडून विश्व व्यापणारी असते. या दिक्कालातीत विश्वात आजचे जड जगही येते. त्या जगाबद्दल कवीच्या हृदयात प्रेम दाटून येते आणि

**प्रेमरसाचे गोड बोल ते, वाद्य लागतां बोलायातें**
**भुललों देखुनि सकळहि सुंदर, सुरांगना तों नाचति भूवर;**
**स्वर्ग धरेला चुंबायला, खालीं लवला—मजला गमला**

असे अद्भुत दृश्य कवीला दिसू लागते.

स्वर्गधरेची भेट ही प्रतिमाही केशवसुतांच्या कवितात काव्याच्या संदर्भातच येते. **'पृथ्वीला सुरलोकसाम्य'** आणण्यास झटणे हेच कवीचे ध्येय, हा विचार त्यांच्या कवितांत वारंवार आलेला आहे. हे सुरलोकसाम्य कसे येते? तर कवीच्या काव्यातून जे भविष्यवाद निघतात त्यांच्यातूनच ब्रह्माला नवीन रचनेची स्फूर्ति लाभते. या आपल्या ध्येयाकडे कवी परत वळतो, तेव्हा सुरुवातीची विषण्णता पार मावळून त्याचे हृदय शांतीने भरून जाते आणि

**असा सुखें मी सदना आलों, शांतीत अहा । झोपीं गेलों**

असा कवी स्वगृही परततो. हे कवीचे घर म्हणजेच त्याचा काव्यनिर्मितीचा धर्म. आपला काव्यनिर्मितीचा धर्म विसरून जगात निरुद्देश वावरणारा—म्हणजेच रस्त्यात विमनस्कपणे हिंडणारा—कवी परत काव्यनिर्मितीकडे वळतो, हेच त्याचे 'सदना येणे'. ही घरी परतण्याची प्रतिमा **'दूर कोठें एकला जाउनीया'** या कवितेच्या अखेरीस याच अर्थाने आलेली आहे.

लोक आपल्या काव्याचा अव्हेर करतात म्हणून विषण्ण होऊन काव्यच सोडून देण्याच्या विचाराने **'सतारीचे बोल'** या कवितेची सुरुवात होते. पण कवीचे हृदय त्याची आळवणी करते आणि हळूहळू त्याच्या विषण्णतेचे करुणेत, करुणेचे आशेत, आशेचे उदात्ततेत, आणि उदात्ततेचे प्रेमात भावांतर होत जाते. या प्रेमाने तो जड जगाकडे पाहू लागतो आणि त्याला आपल्या धर्माची जाणीव होऊन तो **'पृथ्वीला सुरलोकसाम्य आणावाया'** काव्यनिर्मितीकडे परत वळतो आणि त्यातच त्याच्या चित्ताला शांति लाभते. हाच या कवितेचा गाभा.

या दृष्टीने ही कविता वाचली, की तिच्यात केशवसुतांचे काव्यजीवनातील अनुभव आणि त्यांचे तद्विषयक विचार व्यक्त झालेले दिसतात. पण ते अनुभव व विचार सतारीच्या बोलाच्या रूपाने साकार झालेले आहेत, हे विसरून चालणार नाही. या कवितेचा आशय समजून घेण्याच्या प्रयोगात आपण ते सतारीच्या प्रतिमेपासून अलग केले. परंतु त्यांचे ग्रहण त्या प्रतिमेचा स्वीकार करूनच केले पाहिजे. कोणत्याही कवितेचा आशय म्हणजे ती संपूर्ण कविता, तिच्यावरील भाष्य नव्हे, मग ते कितीही समर्पक का असेना. या कवितेकडे पाहण्याची एक दृष्टी यावी, एवढाच या प्रयोगाचा उद्देश. त्यादृष्टीने मूळ कविता वाचली, म्हणजेच तिचा खरा आशय प्रतीत होईल.

***

अनुक्रमणिका



—वि. वा. पत्की

**एकंदरीत मानवी जीवनच असं आहे की ते कधी कोष्टकात बसविता येत नाही. आणि मनुष्य स्वभावाबद्दल आडाखे ठरविता येत नाहीत**



**तशी** अजून संध्याकाळ झाली नव्हती. घड्याळात सहा वाजले असतील—नसतील, पण सांताक्रूझ विमानतळावरच्या 'लाऊंज'-मध्ये दिव्यांचा झगझगाट होता. मऊ मऊ कोचांवर माणसं ऐसपैस रेलली होती. वाळून गेलेल्या फुलांचे हार तिथंच बाजूला ठेवून चहा, कॉफी—नव्हे मिळेल ती पेयं पिण्यात माणसं गुंतली होती. तहान लागली होती म्हणून नव्हे, उगीच गंमत म्हणून, वेळ घालविण्यासाठी. लॉलीपॉप खात, आरडा ओरडा करीत धावणाऱ्या मुलांचा घोळका अंगावरून जात होता, पण तिकडे कुणाचं लक्षच नव्हतं. सारी माणसं आळसावली होती, जांभया देत होती, कारण साडेचारला येणारं विमान दोन तास उशीरा येणार आहे हे 'अनाउन्सर' पुनः पुन्हा सांगत होता. . .

त्या प्रशस्त 'लाऊंज'च्या एका कोपऱ्यात बसलेल्या निर्मलाबाई मात्र समोरच्या मोठ्या घड्याळाकडे पुनः पुन्हा पाहात होत्या. घड्याळातला मिनीट काटा फार सावकाश पुढे सरकत आहे असं त्यांना वाटत होतं. 'वाट पाहायची तरी किती?' अशा विचारांची छटा त्यांच्या मुद्रेवर अगदी स्पष्ट दिसत होती. आकाशाकडे त्या पुनःपुन्हा पाहात होत्या तोच 'अनाउन्सर'चे शब्द त्यांच्या कानावर येत होते, 'एअर इंडियाचं कराचीहून येणारं विमान सुमारे दोन तास उशीरा येईल. साडेसहाच्या सुमारास ते विमानतळावर उतरेल !'

साडेतीन वाजताच त्या विमानतळावर आल्या होत्या आणि एखाद्या वत्सल मातेनं फारा दिवसांनी माहेरी येणाऱ्या आपल्या लाडक्या कन्येची वाट पाहावी तशी त्या रश्मीची वाट पाहात होत्या... रश्मी आज पहिल्यांदा मुंबईला येणार होती, आपल्या लाडक्या किशोरला घेऊन येणार होती. 'गुलाम थेट आपल्या वडिलांच्या सारखा दिसतो' असं रश्मीनं लिहिलं होतं त्यामुळं तर त्याला कधी एकदा डोळे भरून पाहीन असं निर्मलाबाईना झालं होतं. पण आज कराचीहून येणारं विमानच उशीरा येणार होतं, त्यामुळं त्यांची निराशा झाली होती. . .

पण घड्याळात सहा वाजले, तसा त्यांचा जीव अधीर झाला. दहा वेळा तरी त्यांनी 'लाऊंज'च्या दारात जाऊन आकाशाकडे









पाहिलं आणि त्या मनाशी म्हणाल्या, 'किशोर थेट आपल्या वडिलांच्या सारखा दिसतो अं ?' त्या स्वतःशीच हसल्या होत्या आणि त्या हास्यानं त्यांची मुद्रा उजळली होती...

रश्मी येणार होती, किशोर येणार होता. बापासारखा दिसणारा किशोर आता त्यांच्या दृष्टीस पडणार होता. जे कधी दिसलं नव्हतं ते आता त्यांच्या दृष्टीस पडणार होतं, आणि त्याच्या दर्शनासाठी त्यांचा जीव आतुर झाला होता, हुरहुरत होता...

आज पंधरा दिवस त्या स्वतःशी घोकीत होत्या—बारा तारखेला रश्मी येणार, गुरुवारी रश्मी येणार. तिची मनःस्थिति त्या ओळखू शकत होत्या. तिच्या मनातल्या शंका, तिच्या मनातली भीति त्या समजू शकत होत्या. आपण केवढचाहि अगत्यानं तिला बोलावलं तरी ती आली की तिच्याशी कसं बोलायचं, कसं वागायचं याची उजळणी हजारदा त्यानी आपल्या मनाशी केली होती...

त्याचं हे वागणं घरात कुणालाच पसंत नव्हतं. मोहनला पसंत नव्हतं, त्याच्या बायकोला पसंत नव्हतं, पण आईच्या वयाच्या पण नात्यानं वहिनी असलेल्या त्यांना लहान तोंडी मोठा घास घेऊन आपण सांगावं कसं असं मोहनला वाटे, तर त्याच्या बायकोला वाटायचं, माझं नातं जावेचं खरं, पण वहिनी आहेत मला सासूच्या ठिकाणी, त्याना आपण कसं काही सांगायचं ? असं होतं तरीहि मोहननं आणि माणिकनं आपल्या मनातली नाराजी अनेक तऱ्हानी बोलून दाखविली होती, तेव्हा तेव्हा त्या हसल्या होत्या. जणू त्यांचं बोलणं हसण्यावारी नेण्यासारखंच आहे असं त्यांना सुचवायचं असे...

मात्र मोहननं किंवा माणिकनं सांगितलेलं त्यांना पटत नसे. तरीहि त्या म्हणत,

"रश्मी येऊ दे. वाटलं तर तिला इथं राहू दे. किशोरच्या रूपानं देवलांचा वंश पुढे वाढणार आहे ना? निपुत्रिकाला गति नसते हे लहानपणापासनं मी ऐकत आले आणि माझ्या नशिबी अखेर तेच आलं या दुःखानं मी आज पंचवीस वर्षं कशी पिचतेय् ते तुला कळायचं नाही, मोहन ! म्हणून म्हणते, रश्मीला येऊ दे, वाटलं तर तिला इथं राहू दे आणि देवलांची वंशवेल या घरात वाढायचीच असेल तर वाढू दे...

निर्मलाबाई असं म्हणाल्या की मोहनला किंवा माणिकला गहिंवरल्यासारखं होई. आपलीहि अपत्यहीनता त्यांच्या लक्षात येई आणि एक शब्दसुद्धा त्यांच्या मुखातून बाहेर पडत नसे...

रश्मी येणार असं कळल्यापासून निर्मलाबाईंच्या मनात नाना विचारांचे तरंग उठले होते. जे जे घडलं होतं त्याच्या आठवणींनी त्यांचं मन विव्हल झालं होतं. माधवरावांच्या सारखा माणूस असा वागला कसा, रश्मीसारख्या स्त्रीच्या पाशात सांपडला कसा आणि तिला मूल झाल्यानंतरहि आपणाला त्यानी अंधारात ठेवलं कसं, याचं आश्चर्य तर त्यांना वाटलं होतंच पण जे घडलं होतं त्याच्या वेदना त्यांना झाल्या होत्या.

अवघ्या चार वर्षांपूर्वीच त्यांचा संसार केवढ्या सुखासमाधानात चालला होता हे त्यांना आठवत होतं. त्यावेळी ती दिल्लीला राहात होती. भारत सरकारच्या परराष्ट्र खात्यात माधवरावांना चांगली नोकरी होती ती त्यांच्या असामान्य व्यक्तिमत्त्वामुळे—त्यांचा गुबगुबीत चेहरा, धारदार नाक आणि तांबुस गौरवर्ण यांची छाप पडल्यामुळं. पटेल नगरात त्यांचा छान फ्लॅट होता, घरात नोकर होते, चाकर होते, कसली ददात नव्हती. माधवरावांना फुलझाडं लावायचा छंद होता. त्या छंदात ते घरी असले की दंग असत. ती तळमजल्यावरच्या फ्लॅटमध्ये राहात त्यामुळं घराच्या सभोवती असलेल्या मोकळचा जागेत नाना तऱ्हेची देशी-विदेशी फुलझाडं नेहमी बहरलेली असायची. गुलाब, चमेली, जुई, डेलिया, मग्नोलिया, वासांची, बिनवासांची, नाना तऱ्हेच्या फुलांचे आणि वेलींचे ताटवे घरात शिरताना दृष्टीस पडले की आपलं हे वैभव पाहून माधवराव संतुष्ट व्हायचे. 'चाणक्य नगरी'त निरनिराळचा देशांच्या ज्या कचेऱ्या होत्या, तिथं माधव-रावांना नेहमी जावं लागे आणि क्वचित् कोठे एखाद्या देशातलं नवं फुलझाड दिसलं की त्याची लागवड माधवरावांच्या बागेत व्हायला वेळ लागत नसे... फुलझाडांच्या इतकाच माधवरावांना छंद होता तो जादूचे प्रयोग करण्याचा. पत्त्यांचे, नाण्यांचे, हातरुमालांचे नजरबंदीचे असे काही प्रयोग ते करीत की पाहाणाराचं चित्त हरपून जाई. माधवराव देवल म्हणजे एक हौशी, हरहुन्नरी, हसतमुख माणूस म्हणून त्यांची ख्याति सर्वत्र होती आणि त्यामुळं ते सर्वानाच हवेहवेसे वाटत...

पण या भरल्या संसारात एक मोठं वैगुण्यहि होतं. माधवराव आणि निर्मलाबाई यांच्या विवाहाला आता वीस वर्षं झाली होती तरी त्यांच्या घरात पाळणा हालला नव्हता. त्यानी वर्षानुवर्षं वाट पाहिली होती. निर्मलाबाईनी आणि माधवरावांच्या मातोश्री होत्या तोपर्यंत त्यानी सारे नवस-सायास केले होते, देवाला गाऱ्हाणं घातलं होतं, डॉक्टरांशी सल्लामसलत केली होती आणि निर्मलाबाईंनी डॉक्टरांनी सांगितलं ते ऑपरेशन सुद्धा न कुरकुरता करून घेतलं होतं, पण सारे उपाय व्यर्थ ठरले होते. देवलांची वंशवेल आपल्या घरात वाढायची नाही की काय या दुःखानं त्यांना घेरलं होतं. 'संसारात सारीच सुखं माणसाला मिळत नाहीत' या निर्णयावर अखेर ती आली होती आणि त्या विचारानं या पतिपत्नीनं स्वतःचं समाधान करून घेतलं होतं... आश्चर्य असं की माधवरावांनी आपल्या धाकटचा भावाचं तो नको नको म्हणत असताहि लग्न करून दिलं होतं, पण त्यांच्या लग्नाला आता दोन वर्षं झाली तरी त्या घरातहि थोरल्या भावाचाच कित्ता सुरू होता. माधवरावांच्या अंतर्यामी कुठे तरी हे दुःख सलत होतं, पण बाह्यतः ते आपल्या बागेच्या कामात, जादूच्या प्रयोगात, कचेरीच्या वर्दळीत रमलेले दिसत होते. निर्मलाबाई महिला मंडळांच्या सभांत आणि घर नीटनेटकं ठेवण्यात मग्न असत. या घरात आनंद आणि प्रसन्नता काठोकाठ भरली आहे याचा अनेकांना मोठा हेवा वाटे...

पण माधवरावांना आपल्या खात्यात बढती मिळाली आणि कराचीला 'इंडियन हाय कमिशन'च्या कचेरीत 'डेप्युटी चीफ प्रोटो-कोल' अशा नव्या हुद्यावर त्यांची नेमणूक झाली आणि या सुखी संसाराची घडी विस्कटली. वास्तविक तसं होण्याचं कारण

नव्हतं. कराचीलाहि ती गेली असती, तर तिथंहि त्यांना दिल्ली-सारखाच छान फ्लॅट मिळाला असता, तिथंहि माधवरावांनी फुलझाडं लावली असती, जादूच्या प्रयोगांनी बाळ गोपाळच नव्हे, मोठी, प्रौढ माणसंहि स्वत: भोवती गोळा केली असती, निर्मला-बाईंच्या भोवती नव्या नव्या मैत्रिणी जमल्या असत्या आणि 'आनंदी जोडपं असावं देवलांच्या सारखं' अशी त्यांची कीर्ति तिथंहि झाली असती. . .

पण आपणाला वढतीची जागा मिळाली हा आनंद ओसरला आणि कराचीमधील आणि विशेषत: पाकिस्तानातील अंतर्गत घडामोडींच्या खऱ्या खोटया हकिगती त्यांच्या कानांवर आल्या तसं माधवरावांना वाटलं, पाकिस्तानातलं सारं जिणं अस्थिर आहे, धोक्याचं आहे. पण यामुळंच त्यांना वाटलं की तिथं जाण्यात धैर्य आहे, पराक्रम आहे. पाकिस्तानचे आणि भारताचे संबंध वरवर कितीहि सलोख्याचे आणि मैत्रीचे असले तरी परस्पराबद्दलच्या संशयाचा वन्हि आतल्या आत धुमसत आहे आणि वेळ आली तर कधी भडका उडेल याचा भरवंसा नाही असं परराष्ट्र कचेरीतली सारी जाणकार माणसं वोलत होती. तथापि यासाठी भिऊन पाऊल मागं घेण्यात अर्थ नव्हता हें माधवरावांना समजत होतं. एका अर्थानं ते जिद्दीला पेटले होते. पाकिस्तानात जाणं हीहि एक मोठी देशसेवाच आहे या भावनेनंच आलेली नवी नोकरी पत्करण्याचं त्यानी ठरविलं.....

मात्र यावरोबरच आणखीहि एक गोष्ट त्यानी ठरविली. कराचीला जाताना प्रथम एकटंच जावं आणि तिथलं सारं वातावरण वाटतं तेवढं धोकादायक नाही अशी खात्री पटली की मागाहून निर्मलाबाईंनी यावं असं त्यानी ठरविलं. निर्मलाबाई समंजस होत्या. नवऱ्याच्या वागण्यातला अर्थ त्यांना समजत होता, त्यामुळं माधवरावांनी जे ठरविलं होतं त्याला त्यानी संमति तर दिलीच आणि त्याच म्हणाल्या,

"तुम्ही एकटेच जा कराचीला. सारं सामान घेऊन मी मुंबईला जाते. गेल्या वर्षभर सासूवाईहि अंथरुणाला खिळून आहेत. मोहनभावजी आणि माणिक दोघंहि नोकरीत अडकलेली, ती कितीशी त्यांच्याकडे लक्ष देणार? परमेश्वर करतो ते सारं बऱ्यासाठीच. मी मुंबईला जाईन, तिथं राहीन, सासूवाईंचे औषधोपचार पाहीन. त्यांची सेवा माझ्या हातून घडावी आणि मगच देवलांचा वंशवृक्ष वाढावा अशी देवाचीच इच्छा असेल तर तसंहि होईल. . ."

बोलता वोलता निर्मलावाई गहिंवरल्या होत्या. नवऱ्याच्या प्रत्येक कृतीला पत्नीनं साथ द्यायला हवी या भावनेनं त्या वागत होत्या. . .

त्या मुंबईला येऊन राहिल्या तेव्हा प्रथम प्रथम तरी त्यांना चुकल्या चुकल्यासारखं वाटलं. गेल्या वीस वर्षांत पतीच्या सान्निध्यात राहायची त्याना एवढी संवय झाली होती की माधवराव कराचीला निघून जाताच आपल्या जीवनात एक विचित्र रितेपणा आल्यासारखं त्यांना वाटलं. आपलं डोकं दुखू लागलं की केवढया मायेनं माधवराव ते चेपायचे, कधी पाठीत उसण भरली की अगदी हलक्या हातानं ते 'आयोडेक्स' कसे चोळायचे या साऱ्या आठवणी रात्री झोप न लागल्यामुळं अंथरुणावर तळमळत राहिल्या की त्यांच्या मनात तरारून यायच्या, त्यांना अस्वस्थ करायच्या. माधवरावांना रात्री मधेच उठून पाणी पिण्याची सवय होती आणि उशागती काचेचं भांडं भरून आणि त्याच्यावर छोटा ग्लास ठेवायला त्या कधी विसरायच्या नाहीत. रात्री झोप लागेनाशी झाली की या वेळी कदाचित् माधवरावहि जागे झालेले असतील, उठून पाणी पीत असतील असं त्यांना उगीचच वाटायचं. पण एखाद्या दिवशी त्यांच्या मनात यायचं, त्यांच्या बिछान्याजवळ आता पाण्याचं भांडं भरून कोण ठेवीत असेल? आपण कराचीला आल्यापासून रायबरेलीचा रामशरण म्हणून एक स्वयंपाकी ठेवला आहे, तो उत्तर प्रदेशातले नाना तऱ्हेचे पदार्थ आपणाला करून कसे घालतो, आपली यत्किंचित्हि आबाळ कशी होऊ देत नाही, तू काही काळजी करू नको, मजेत राहा, असं माधवराव आपणाला लिहीत असले तरी तो रात्री पाण्याचं भांडं भरून ठेवायला विसरत तर नसेल, किती झालं तरी ही पगारी माणसं म्हणजे सांगितलेल्या कामाची आणि दिलेल्या पैशांची, त्यांच्यात आंतरिक उमाळा कुठून असणार असं वाटून त्यांच्या मनात यायचं. छे:, आता या वयात त्यांना असं एकटं ठेवून उपयोगी नाही. हे वयच असं असतं. धड तारुण्य नव्हे, धड वार्धक्य नव्हे. आपलं माणूस जवळ असावं असं माणसाला सारखं वाटतं या वयात. . .

माधवरावांचं आठवडयाच्या आठवडयाला पत्र आलं नाही असं कधी झालं नाही. आपणाला 'क्लिफटन पार्क'मध्ये मिळा-

## आणखी एक 'फशीं' पडला!




**पौंडाच्या अवमूल्यनाचा भारतावर काय परिणाम होणार हे अजून भारताला कळले नाही—एक बातमी.**








लेला फ्लॅट आपल्या दिल्लीतील पटेलनगरमधील फ्लॅटपेक्षा कसा छान आहे, इथं प्रत्येक बंगल्यालाच छोटीशी बाग कशी आहे, त्या बागेत नवी नवी फुलझाडं आपण कशी लावणार आहो, रस्ते चांगले असले तरी या भागात धुळीचे कण डोळ्यात सारखे कसे जात असतात आणि त्यामुळं आपण कराचीत आल्यापासून गॉगल् लावूनच कसे वावरतो, शेजारच्या फ्लॅटमध्ये राहाणाऱ्या चतर्जींना कुत्रे पाळण्याचं वेड कसं आहे, इकडे महाराष्ट्रीय माणसं क्वचित भेटल्यामुळं मराठी शब्दहि कानावर सहसा कसे येत नाहीत अशा हजार गंमती गंमतीच्या गोष्टी माधवराव लिहीत. पण हे सारं लिहून झालं की ते म्हणत, आमच्या 'एम्बसी'त काम करणाऱ्या फार थोड्या माणसांनी आपल्या मुला माणसांना इथं आणलेलं आहे. पाकिस्तानची भारताशी मैत्री असली तरी हा सारा वरवरचा देखावा आहे अशी भावना इथं सर्वत्र पसरलेली आहे. फार पूर्वीपासून इथं स्थायिक झालेली अनेक भारतीय कुटुंबं आहेत ती त्यामुळं आपल्याच हाडामासाची आहेत असं वाटतं आणि त्यांच्याबद्दल न कळत आपलेपणा वाटतो तू इथं येशील तेव्हा आपल्या माणसांसाठी ही माणसं कशी भुकेलेली आहेत हे तुलाहि कळेल. . .

तोच तोच मजकूर लिहून मग माधवराव जणु कंटाळले होते. त्यांची पत्रं येत, पण ती त्रोटक असत. रामशरण आपली सारी काळजी घेत असला तरी त्याला गांजा ओढायचं व्यसन कसं आहे आणि या व्यसनापायी तो कधी कधी तासन् तास घरी कसा नसतो, एखाद दिवशी रात्री कसा येतहि नाही असं माधवरावांनी लिहिलं की निर्मलाबाईंना वाटे, ही नोकर माणसं अशीच असणार! मी गेले की आधी या रामशरणची घरातनं उचलबांगडी करायला हवी. हवा कशाला स्वयंपाकी? आणि तोहि गांजा ओढीत बसणारा आणि रात्ररात्र बाहेर राहाणारा?

पण ही वेळच आली नाही. गेली दीड–दोन वर्षं अंथरुणाला खिळलेल्या माधवरावांच्या मातोश्रींची तब्येत एकदम बिघडली. घरातली माणसं तर घाबरलीच, पण डॉक्टरहि आशा सुटल्यासारखे बोलू लागले. 'त्यांना आता कसली इंजेक्शनं नकोत, काही नकोत. त्यांच्या शरीराला आणखी वेदना आता नकोत. वाटलं तर माधवरावांना कळवा. मुलगा भेटला नाही याचं दुःख नको त्याना अखेरच्या क्षणाला!' अशी निर्वाणीची भाषा डॉक्टरहि बोलू लागले तेव्हा निर्मलाबाईनी माधवरावांना तार पाठविली आणि चार दिवसानी माधवराव आले ते केवळ मातेची अखेरची दृष्टीभेट व्हावी असा विधिसंकेत होता म्हणूनच!

आईच्या मृत्यूचं दुःख माधवरावांनी मनाला फार लावून घेतल्यासारखं दिसलं. निर्मलाबाईना या दुःखाची कल्पना होती. पाच–सहा वर्षांपूर्वी त्यांची आई वारली तेव्हा आपलंहि मन कसं व्याकूळ झालं होतं, आपलंहि कुठे कसं लक्ष लागत नव्हतं हे त्याना माहित होतं. माधवरावांचं कुठंच लक्ष लागत नव्हतं याचा अर्थ त्या समजू शकत होत्या आणि घालता येईल त्या उपायांनी त्यांच्या दुःखावर त्या सहानुभूतीची फुंकर घालीत होत्या. या



अनुक्रमणिका

वेळी त्याना जपायला हवं हे त्यांना समजत होतं. आता त्याना एकटं ठेवण्यात अर्थ नाही हे ओळखून मग त्या म्हणाल्या,

"मी आता इथं राहाण्याची गरजच नाही. सासूबाई गेल्या आणि तिथं तुम्हालाहि एकटयाला राहावं लागतं......"

क्षणभर विचार केल्यासारखं करून माधवराव म्हणाले होते,

"तूं म्हणतेस ते खोटं नाही. पण पाकिस्तानात सारं काही अस्थिर आहे. रोज कुरबुरी सुरू असतात. कधी अमेरिकेशी तर कधी चीनशी वाटाघाटी सुरू असतात, त्यामुळं पाकिस्तान युद्धाची तयारी करीत आहे की काय अशी सुद्धा शंका येत असते, पण 'एंबसी'त काम करणाऱ्यानी तोंड उघडायचं नसतं असा संकेत आहे तो पाळावा लागतो. थोडे दिवस तरी वाट पाहायला हवी. परिस्थिति कदाचित् सुधारेलहि. ती सुधारली की मी तुला कळवतो. मग तू लगेच ये. . ."

माधराव एकटेच कराचीला गेले होते. त्यांची पत्रंहि आता आठवडयाच्या आठवडयाला येत नव्हती. आईच्या औषधोपचारांचा खर्च कमी झाला होता आणि मोहनचा पगार बढतीमुळं आता वाढला होता म्हणूनच की काय पहिल्याएवढे पैसेहि ते आता पाठवीनासे झाले होते. 'चेंबूरला चाळीस हजारात आता छोटे छोटे बंगले बांधून मिळतात, त्यातला एक तुझ्या नांवानं 'बुक' करतो, दहा हजारांचा हप्ता दर चार महिन्यांनी भरावा लागेल तेवढा पाठव' असं मोहननं त्यांना सांगितलं होतं त्यासाठी बहुधा ते पैसे साठवू लागले होते असं निर्मलाबाईना वाटलं....

वर्षभरात त्यांची पांच-सात सुद्धा पत्रं आली नाहीत आणि एके दिवशी पाकिस्ताननं भारतावर आक्रमण केल्याची बातमी आली तेव्हा तर निर्मलाबाई घाबरल्याच, पण मोहन आणि माणिकहि घाबरली. रोज युद्धाच्या नव्या नव्या बातम्या येऊ लागल्या, भारताविरुद्ध पाकिस्तानात निदर्शने होऊ लागली.....पाकिस्ताननं भारताच्या हद्दीत घुसून आक्रमण सुरू केलं, अमृतसर, अंबाला या ठिकाणी बाँब टाकले, आणि पाकिस्तान दिल्लीवरहि बाँब टाकणार अशा बातम्या उठल्या तेव्हा सारा हलकल्लोळ माजला. पण भारतानं प्रत्युत्तर देऊन लाहोरपर्यंत मुसंडी मारली तसं पाकिस्तानातलं लोकमत प्रक्षुब्ध झालं. कराचीतील भारतीय वकिलातीवर लोक चालून गेले, गोळीबारापर्यंत मजला गेली आणि दुसऱ्या दिवशीच वृत्तपत्रांतून बातमी आली,

"भारतीय वकिलातीत जो गोळिबार झाला त्यात एक अधिकारी आणि एक नोकर याना मृत्यु आला. नोकराचे नांव अद्याप समजले नसले तरी मारले गेलेले अधिकारी श्री. एम्. जी. देवल यांची ओळख पटली असून त्यांच्या मागे त्यांच्या पत्नी व दहा महिन्यांचा मुलगा आहे."

आपण काय वाचीत आहो याचा अर्थबोधच प्रथम निर्मलाबाईना झाला नाही, पण त्या बातमीचा अर्थ क्षणात त्यांच्या लक्षात आला तसा त्यानी हंबरडा फोडला. मोहन आणि माणिक धावून आली आणि वर्तमानपत्रातली बातमी वाचताच त्यांना धक्का तर बसलाच, पण आपला हुंदका त्यांनाही आवरता आला नाही. शेजारी-पाजारी धावून आले होते पण कुणालाहि त्यांचं सात्वन करता आलं नव्हतं. . .

खरा प्रकार काय आहे हे काहीच समजत नव्हतं. शेजारी राहाणाऱ्या एका वकिलांनी ज्या वर्तमानपत्रात ती बातमी आली होती त्यांच्याकडे फोन करून चौकशी केली तेव्हा त्याना सांगण्यात आलं की वर्तमानपत्रात छापलेल्या बातमी पेक्षा 'मेसेज'-मध्ये अधिक काहीच नव्हतं......दिल्लीहून मग परराष्ट्र खात्याकडून एक तार आली होती तिच्यातहि याहून नवीन असं काही नव्हतं. कुटुंबियांच्या विषयी सहानुभूति तेवढी होती. . .

मोहननं दिल्लीला ट्रंककॉल केला, पण त्या ठिकाणीहि काही समजलं नाही. आलेल्या बातमीनं साऱ्यानाच एक विलक्षण बधिरता आली होती, पण ती हळूहळू ओसरली तसं एक नवं कोडं सर्वानाच पडलं. 'त्यांच्या मागे त्यांची पत्नी व दहा महिन्यांचा मुलगा आहे' याचा अर्थ काय हे कुणालाच कळत नव्हतं. अंधारात कोणीतरी लोखंडी गजाचे प्रहार एखाद्याच्या डोक्यावर करावे आणि त्याच्या असह्य यातना तेवढ्या व्हाव्या तसं निर्मलाबाईना झालं होतं. त्या बातमीच्या आघातानं त्या कोलमडल्या होत्या, बिछान्यावरून त्याना उठताहि येत नव्हतं.....आपल्यासारखी भाग्यवान्, सुखी स्त्री कोणी नसेल असं त्यांना आतापर्यंत वाटत होतं, पण एका क्षणात सारं बदललं होतं. आपल्यासारखी अभागी, दुःखी स्त्री या जगात कोणी नसेल या जाणीवेनं त्यांना घेरलं आणि त्या हतबुद्ध झाल्या. त्यांचं सर्वस्व गेलं होतं आणि वैधव्य तेवढं उरलं होतं. . . .

भारत—पाकिस्तान युद्धाचा वणवा भडकतच होता. काहीच अधिक माहिती मिळेना तेव्हा मोहन दिल्लीला गेला, परराष्ट्र कचेरीतल्या अधिकाऱ्यांना भेटला, पण कुणालाच काही माहिती नव्हती. 'सध्याची परिस्थिती निवळेपर्यंत तुम्हाला कराचीलाहि जाता येईलसं वाटत नाही' असं त्याला परराष्ट्र कचेरीतल्या एका वरिष्ठ अधिकाऱ्यानं सांगितलं तेव्हा तो बेतहि त्याला सोडून द्यावा लागला. . . .

निर्मलाबाई आता दुःखाच्या पहिल्या आवेगातून बाहेर आल्या होत्या. त्यांच्या मुखावरचं हास्य आता लोपलं होतं, तरी मुखातनं शब्द बाहेर पडू लागला होता. मोहननं आपलं दुःख आवरलं होतं आणि संधि मिळाली की मीच कराचीला जाऊन येतो असं तो म्हणू लागला होता. . .

तशी संधि मग खरोखरच आली. युद्धाची तणातणी कमी झाली होती. दोन्हीहि राष्ट्रांच्या नेत्यानी एकत्र भेटून आपले मतभेद मिटवावे आणि त्यासाठी ताश्कंदला भेटावं अशी योजना रशियानं आखली होती. भारताचे पंतप्रधान आणि पाकिस्तानचे अध्यक्ष यानी या योजनेला मान्यता दिली होती. वातावरण निवळलं होतं आणि मोहनला कराचीला जाण्यात अडचणी उरल्या नव्हत्या.....




मोहन कराचीला भारतीय वकिलातीत गेला तेव्हा त्याला किती तरी नव्या गोष्टी समजल्या. रश्मी नांवाच्या वकिलातीतील एका मुलीबरोबर आपल्या भावाचं लग्न झाल्याचं आणि त्यांना मूल झाल्याचं त्याला समजलं तेव्हा सारा प्रकार त्याच्या लक्षात आला. माधवराव गोळीबाराला बळी पडले याबद्दल साऱ्यानीच हळहळ व्यक्त केली, पण त्यांच्याबरोबर काम करणारे एक अधिकारी म्हणाले,

"जे घडलं ते भयंकर होतं. आम्ही सारेच हतबुद्ध झालो होतो. दिल्लीशी संबंध तुटल्यासारखे झाले होते. तुम्हाला काही कळवताहि येत नव्हतं. कसं कळवायचं हेहि समजत नव्हतं. रश्मी-ताईनी आकांत मांडला होता. काय करावं हे त्यांना सुचत नव्हतं. अगोदरच त्यांना कुणाचा आधार नव्हता. आता तर त्या सर्वस्वी निराधार झाल्या होत्या..."

"आता कुठे आहेत त्या?"

"पूर्वीच्याच जागेत आहेत. त्या आमच्या कचेरीत पूर्वी स्टेनो होत्या, आताहि स्टेनो म्हणून काम करतात......"

"मला त्यांना भेटता येईल आजच्या आज?"

"आजच्या आज कशाला, आत्ता जाऊ या!"

मोहन मग त्यांच्याबरोबर क्लिफ्टन पार्कमध्ये गेला होता, रश्मीला भेटला. ऐन पंचविशीतली ती म्लानवदना पाहून तो दचकला होता आणि तो माधवरावांचा भाऊ आहे हे समजताच तिला रडू कोसळलं होतं. त्याच्याशी कसं बोलावं, त्याला काय सांगावं हे तिला समजत नव्हतं. पण भावनांचा पहिला कढ ओसरताच ती म्हणाली,

"माझं तोंडदेखील पाहू नये असं तुम्हाला वाटत असेल...."

"तसं असतं तर इतक्या लांबून मी आलो नसतो!"

मोहनच्या त्या शब्दानी तिला जरा धीर आला. तशा परि-स्थितीतहि तिच्या कोमेजलेल्या मुखावर हास्यरेषा उमटली. तिला जरा मोकळं वाटलं. त्याच्याबरोबर आलेले अधिकारी त्याचा निरोप घेऊन गेले तशी ती म्हणाली,

"तुम्हाला एक दाखवायचं आहे."

"मला?"

"होय...माझा किशोर दाखवायचा आहे तुम्हाला!"

असे म्हणत ती त्याला पलिकडच्या खोलीत घेऊन गेली आणि मच्छरदाणीचं टोक वर करीत म्हणाली,

"पाहिलंत!?"

गुबगुबीत गालांची, तांबूस रंगाची, धारदार नाकाची डोळ्या-वरचं काळ्याभोर केसांचं जावळ भुरभुर उडत असलेली ती निद्रामग्न बालमूर्ति दृष्टीस पडताच मोहनला वाटलं, दिवंगत झालेला आपला लाडका भाऊच बालरूप घेऊन पुन्हा इथं पहुडला आहे.....

मोहन मग तीन चार दिवस तिथं राहिला तेव्हा रश्मीकडूनच त्याला सारी हकिगत समजली होती. दिल्लीहून आल्यानंतर माधव-



एक बेताल चित्र

## दीपचंदी (की लूपचंदी)

**जागेच्या अडचणीमुळे जिन्याखालीच गर्भवती झालीस;**
**आणि पाळण्याने मात्र कायमचे ठाण मांडले; त्या खाटेवर**
**पुढे कितिकदा प्रसवली होतीस आणि 'मंदा'च्या**
**नंतर 'कुंदा' होऊन दोन बारशी आटोपली होती.**
**तेव्हा तुझा तिसरा पाळणा लांबला नव्हता;**
**तो 'जाई'नं जवळ केला होता ... अनंत काळाची माता होतीस,**
**पण माझी पत्नी होतीस, वरवरच्या दुधाची सोय होती;**
**आणि खर्चाला 'लय' होती. व्याजासकट कर्जावलो होतो,**
**... पाणी भरताना अचानक भोवळ झालीस.**
**तेव्हा तुझा सातवा पाळणा लांबला नव्हता;**
**तो बकुळीने बळकावला होता...संसाराच्या खस्ता—खस्तांतून**
**तुझ्या पाळण्याचा ताप होता; मुलींचीच 'ग्यारंटी' होतीस;**
**माता होऊनही मावी होतीस ...**
**तेव्हा तुझा दहावा पाळणा लांबला नव्हता;**
**तो माझ्या मूर्खपणामुळे झुलत होता. कारण मीच मूर्ख होतो.**
**तुझ्या वाढत्या पिलावळीत गोंधळून गेलो होतो. जेव्हा अचानक**
**कमरेला पदर खोचून निश्चय करून पुढे झालीस**
**आणि 'सुमी'वर झालेली चूक सुधारून 'लूपवती' झालीस.**
**... तेव्हा तुझा चौदावा पाळणा दैवाने थांबवला होता.**

**—ह. शि. खरात**

रावांची स्टेनो म्हणून आपली आणि त्यांची ओळख कशी झाली, ते एकदा भयंकर आजारी पडले तेव्हा त्यांची सेवा करण्याची संधि आपणाला कशी मिळाली, त्यांचं फुलझाडांचं वेड इथं आल्या-पासून कसं वाढलं आणि त्यांचे जादूचे प्रयोग हे एक मोठं आकर्षण सर्वानाच कसं वाटे हे सांगून ती म्हणाली,

"खरं सांगू तुम्हाला? या अफाट जगात आपण एकटीच आहो ही माझी भावना ओसरली ती माधवरावांच्या सान्निध्यात आल्यावर. १९४७ साली देशाची फाळणी झाली तेव्हा कराचीच्या साऱ्याच महाराष्ट्रीय कुटुंबांची वाताहात झाली. माझी आई लहान-पणीच वारलेली. मी सारी पांच सहा वर्षांची. त्यात एके दिवशी वडीलहि कुठे बेपत्ता झाले आणि वाढले ती एका सिंधी व्यापा-ऱ्याच्या घरात. मराठी शब्दहि तिथं कानावर येत नसे. पण आई-बापावेगळी एक अनाथ मुलगी म्हणून धिरुमलशेटजीच्या कुटुंबात मी वाढले, शिकले, कॉलेजात जाऊ लागले. तोच एके दिवशी धिरुमलशेटजीच हृदयविकारानं वारले. मी सर्वस्वी निराधार

अनुक्रमणिका







झाले. नोकरी शोधू लागले. भारतीय वकिलातीतल्या अधिकाऱ्यांना भेटले. त्याना माझी दया-आली. कारकून म्हणून नोकरी करू लागले. टायपिंग शिकले, स्टेनोग्राफी शिकले. याच वेळी माधवराव इथं आले. दुसऱ्याविषयी एवढा आपलेपणा असलेला माणूस मी आयुष्यात कधी पाहिला नव्हता. त्यांच्या सान्निध्यात आले त्या क्षणीच माझा एकटेपणा गेल्यासारखं मला वाटलं. मी त्याना खाऊ-पिऊ घालू लागले आणि—"

रश्मीला पुढं बोलवलं नाही. पण कसा बसा आवंढा गिळीत ती म्हणाली,

"मला तुम्ही तुमच्या कुटुंबाची वैरीण मानावी अशी मी वागले आणि त्याची आठवण या किशोरच्या रूपानं मागं राहिली. पाहाणारी सारी म्हणतात, थेट बापासारखा आहे, धारदार नाकाचा, गुबगुबीत गालांचा..... मला पूर्वी कोण नव्हतं, पण आता कोण नाही असं आता वाटत नाही मला. मला सारखं वाटतं, याच्यासाठी जगावं, याला वाढवावं, मोठं करावं. माझी खात्री आहे की हा मोठा झाला कीं आपल्या वडिलांच्या सारखा दिसेल. . . ."

मोहन कराचीहून परत आल्यापासून आणि त्याच्या तोंडून सारी हकिगत ऐकल्यापासून निर्मलाबाईंचं मन कावरंबावरं झालं. जे घडलं होतं तं सारंच अनपेक्षित होतं. हे घडलं कसं या प्रश्नाला उत्तर नव्हतं. एकंदरीत मानवी जीवनच असं आहे की ते कधी कोष्टकात बसविता येत नाही. आणि मनुष्यस्वभावाबद्दल आडाखे ठरविता येत नाहीत, या निष्कर्षावर त्या आल्या होत्या, पण तरीहि त्यांना वाटत होतं, दोन देशाच्या वैरानं अखेर माझ्या सुखाचा बळी घेतला. कुणी सांगावं, मी त्यांच्याबरोबर सुरुवातीलाच कराचीला गेले असते तर जे घडलं ते कदाचित् घडलं नसतं. . . . .

पण आता होऊन गेलेल्या गोष्टीबद्दल शोक करीत बसण्यात अर्थ नव्हता हे त्याना समजत होतं. त्यांच्या मनात सारखं येत होतं, जे अपत्यसुख त्याना मी देऊ शकले नव्हते ते रश्मीनं त्याना दिलं म्हणून मी तिचा तिरस्कार करावा? तिला वैरीण मानावं? जी चूक आता कधीच दुरुस्त करता येणार नाही ती केल्याबद्दल कुणावर तरी जन्मभर सूड घ्यावा. . . .?

रश्मीची कथा हळूहळू सर्वांना माहित झाली होती 'हिनं तुमचं वैर साधलं!' असे उद्‌गार निर्मलाबाईंना कधी ऐकू आले नव्हते, पण ते सभोवतालच्या माणसांच्या दृष्टीत त्याना दिसले होते, पण कालांतरानं सभोवतालची माणसं हे विसरल्यासारखी दिसू लागली तसा एक नवाच विचार निर्मलाबाईंच्या मनात येऊ लागला,

'मला तुम्ही तुमच्या कुटुंबाची वैरीण मानावी अशी मी वागले असं रश्मी मोहनभावजींच्या जवळ म्हणाली असली आणि मोहनभावजी किंवा माणिक यांनाहि तसंच वाटत असलं, तरी देवलांच्या वंशाची वेल तिच्या उदरातच अखेर वाढली आणि देवलांचं नांव अखेर हा छोटा किशोरच पुढे चालविणार आहे हे काय खोटं आहे? आणि हे जर खोटं नसेल तर या वेलीला स्नेहाचं आपुलकीचं खतपाणी नको घालायला ?. . . . छे, छे, रश्मीला असं दूर लोटून चालायचं नाही. तिची इच्छा असेल तर तिला इथं आणायला हवं! मोहनभावजी तर म्हणतात छोटा किशोर अगदी थेट आपल्या बापासारखा दिसतो . . . . रश्मी इथं आली तरच माझ्या दृष्टीसमोर तो सारखा राहील, नाही का? . . . .

निर्मलाबाईंना ठाऊक होतं की आपल्या मनातला हा बेत बोलून दाखविण्यात काही अर्थ नाही. मोहनभावजी आणि माणिक यांना तर ती कल्पना आवडायची नाहीच. पण रश्मीलासुद्धा काय वाटेल कुणास ठाऊक? तरीहि त्यानी ठरविलं की कुणालाहि न सांगता रश्मीला पत्र लिहायचं. तिचं उत्तर आलंच तरी तेहि कुणाला कळण्याची शक्यता नव्हतीच, कारण रोज टपाल येतं तेव्हा ती असतातच कुठे घरी?

त्यानी आपल्या मनातला बेत पार पाडला. त्याना एकदा वाटलं, रश्मी आपल्या पत्राचं उत्तरहि पाठवायची नाही. आपल्या जखमेवर मीठ चोळण्याचा हा प्रयत्न आहे असे तिला वाटेल. सवतीला प्रेमानं वागविण्याचा हे केवळ नाटक आहे असाच तिचा ग्रह होईल.

पण निर्मलाबाईंचा हा अंदाज तर चुकलाच पण रश्मीनंच लिहिलं,

"मोहनराव येऊन गेल्यापासूनच मला वाटत होतं की तुमची इच्छा नसली तरी सुद्धा एकदा मुंबईला यावं आणि किशोरला तुमच्या मांडीवर ठेवावा आणि तुम्ही त्याचं कौतुक केलेलं डोळे भरून पाहावं. तुमचा राग असलाच तर तो माझ्यावर असेल, किशोरवर नाही असं मला वाटलं होतं आणि आता तर तुम्ही लिहिताहा की जे सुख मी देऊ शकले नाही ते अपत्यसुख तू दिलंसच, पण देवलांची वंशवेल वाढली ती तुझ्या उदरात, तुला मी परकी कशी मानीन? एवढ्या थोर मनाची माणसं या पृथ्वीतलावर आहेत यावर माझा विश्वासच बसला नसता, पण तुमच्या पत्रानं वाटलं, जगातली माणुसकी अजून आटलेली नाही नाही. . . . !

रश्मीच्या या पत्रानं निर्मलाबाईंना एवढं कौतुक वाटलं की मोहनभावजीना ते पत्र दाखविल्यावांचून त्यांना राहवेना. पण ते पाहाताच मोहन हसला आणि म्हणाला,

"सारं जगावेगळंच आहे हे! जे कोणतीहि स्त्री करणार नाही ते तुम्ही करणार आहा!"

निर्मलाबाई हसल्या, मनापासून हसल्या, आपलं दुःख विसरून हसल्या आणि त्यानी रश्मीला लिहिलं,

"ये, ये, लौकर ये; शक्य तेवढ्या लौकर ये!"

आता विमानतळावर विमानाची वाट पाहाता पाहाता निर्मलाबाईंना हे सारं आठवत होतं आणि त्यांचे डोळे लागले होते तें आकाशातल्या विमानाकडे! काही केल्या घड्याळातले काटे पुढे सरकत नव्हते असं त्याना वाटत होत.

पण अखेर 'अनाउन्सर'नं विमान उतरत असल्याचं सांगितलं तसं त्यांचं अंतःकरण धडधडलं, घशाला कोरड पडल्यासारखं त्यांना झालं . . . . विमानतळावरच्या कठडयाला टेकून मोहन, माणिक आणि निर्मलाबाई उभ्या होत्या आणि हे सहा डोळे स्थिरावले होते ते येऊन थांबलेल्या विमानावर....शिडी लावायला लागलेला वेळसुद्धा त्याना अधिक वाटला आणि विमानातून माणसं उतरू लागली तशी रश्मी कोठे दिसते का म्हणून त्यांची दृष्टि भिरभिरली. कस्टम्सचे सारे सोपस्कार आटपेनात तेव्हा निर्मलाबाईना राहवेना आणि रांगेत उभ्या राहिलेल्या रश्मीला आणि तिनं उचलून घेतलेल्या किशोरला कधी एकदा जवळ घेईन अशी त्यांच्या मनाची उताविळी झाली. . .

आणि रश्मी बाहेर आली तेव्हा तिच्या जवळच्या किशोरला निर्मलाबाईनी अधीरपणानं ओढून जवळ घेतलं. होय, तेच गुबगुबीत गाल, तेच धारदार नाक! माधवरावांची प्रतिकृतीच आपल्या बाहुपाशात आली आहे असा भास त्याना क्षणभर झाला आणि किशोरचे कितीहि मुके घेतले तरी त्यांचं समाधान होईना. रश्मी अनिमिष नेत्रानी हे सारं क्षणभर पाहात राहिली पण मग आपला भावनावेग तिला आवरला नाही आणि तिच्या नेत्रातून अश्रू कधी पाझरले हे तिचं तिलाच कळलं नाही! ●



अनुक्रमणिका

अनुक्रमणिका











—सौ. अंजली ठकार



**....मग माझी सुशा पुन्हा बकुळीचा गजरा घालून फिरायला येईल. बकुळीसारखीच सदा हसरी आणि सुगंधाने वेढणारी.**



**बाहेर** मुसळधार पाऊस कोस-
ळत होता. त्या टिपेतल्य
आवाजावरूनच सुषमाने ओळखले. ती
हलकेच उठली आणि खिडकीपासच्य
आरामखुर्चीत वसली. क्षणभर इच्छ
झाली—बाहेरच्या पावसात उभे राहून
मस्त भिजावे. पण छे! नुसत्या कल्पनेनेहि
अंगातला अशक्तपणा आणिकच वाढला
भिजलेल्या पानांच्या बटा मागे सारीत
बकुळी तिच्याकडे बघून हसली. सुषम
डोळे मिटून घेत पुटपुटली, "बकुळ
सगळे पाहिलेस. माझ्या दोन्ही चिमण्य
तुझ्या छायेत खेळल्या, वाढल्या. तिसर
राजसंलाल पदराखाली जपत टॅक्सीतून
उतरले, आणि प्रथम दृष्टि वळली त
तुझ्याकडे. एखाद्या सुजाण सुलक्षणी भाव
जयीला सांगावे तसे मी तुला सांगितले
'तू म्हणालीस तसेच झाले ग बाई—कृष्ण
परमात्मा आला खेळायला'—" सुषमान
डोळे उघडले. पाऊस रिपरिप पडतच
होता. पडायचाच तो—नेमेचि येणारा
सगळे चालायचे तसे चालले होते. बकु
ळीने आधी भिजायचे, मग फुलायचे
मग केशरी केशरी बकुळांनी फळफळायचे
ही झाडे, हे घर, ही जमीन, ही रहदार
सगळे असेच कायम राहणार होते. ह
आरामखुर्ची – हा समोरचा आरसासुद्धा
केवळ अपघाती मरणच याच्या आयुष्यात
एरवी काळाचा एवढासासुद्धा चरा नाह
उठायचा. माणसाला मात्र केव्हाना केव्ह
मरणाशी झुंजावेच लागते. झुंज—छे! तिल

अनुक्रमणिका

वाटले, आपल्या बाबतीत तरी या शब्दाची ही चेष्टा आहे. झुंज कसली—आपण एक यःकश्चित् बकरी! मृत्यूला सध्या वेळ नसावा. नाहीतर एका पंजात खलास. सुषमाला नेहमी—नेहमी दचकवणारे, भेडसावणारे ते दृष्य भुतासारखे पुढे ठाकले. बाहेर तयारी चालली आहे—आपली—एका सवाष्णीची. जमलेली उघडी-बोडकी मंडळी चुकचुकताहेत. कुजबुजताहेत. तिने हाताने डोळे घट्ट दाबून धरले. छेः छे! मनाच्या अंधारकोठडीत दुसरा विचार शिरूच शकत नाही का? या दृष्यापासून लांब गेले पाहिजे. खोली बदलली—कॉट बदलली—पण ते दृष्य सावलीसारखे पाठलाग करते.

सुषमा उठून तडक सैंपाकघरात गेली. पण तेवढ्यानेही तिला धाप लागली. ती हळूच पाटावर बसली. आठ वर्षांची शुभी तिथे लुडबुडत, खुडबुडत होती. डबा पुसत होती—तिच्या बाबांचा. सुषमा सावरून बसत म्हणाली, "आण इकडे शुभे—मी भरते डबा."

"नको आई, तू दमशील, हे घ्या न् ते घ्या करून. बघ तर खरी मी कसा भरते ते. बाबा रोज मला शाब्बासकी देतात". शुभी शहाण्यासारखी गोड बोलली.

पोळी लाटता लाटता खालमानेनेच सासूबाई म्हणाल्या,

"आलीच आहेस सैंपाकघरात तर तूच चार घास घे खाऊन. पुन्हा जीव घाबरायला लागला की काही सुचायचे नाही."

सुषमा फक्त मानेने नको म्हणाली. तोंडाला चव नव्हती—अर्धी पोळी खाल्ली की पोट भरायचे. शुभीने डब्यात पोळ्या घातल्या—भाजी भरली—डब्याच्या बाहेर आलेला ओघळ अगदी तिच्याच-सारखा निपटला, आणि हसून आईकडे पहात म्हणाली, "असेच ना आई?"

सुषमेलाही क्षणभर हसू आले.

"आणि दह्याची वाटी ग?" सुषमाने विचारले.

"हल्ली काय की—तो नकोच म्हणतो दही. मग मी काही देत नाही." सासूबाई पोळी भाजता भाजता म्हणाल्या.

सुषमेला कळले. वाटीतले दही हलून बाहेर सांडलेले त्याला आवडत नसे. दही नीट लागत नसेल. सुषमा काहीच बोलली नाही. बोलण्याचा तिला काय अधिकार होता? काय संबंध होता तिचा या सैंपाकघराशी? जी कामे करता करता तिचा दिवस भुर्रकन् उडून जायचा ती सारी कामे आता परस्पर बिनबोभाट होत होती. तिच्याशिवायं कुणाचेच काही विशेष अडत नव्हते. शुभीची वेणी सासूबाई घालायच्या. दिलूला शाळेत पोचवणे, निवडण, ही कामे बाईकडे होती. मुलेही हल्ली तिच्याजवळ फारशी येत नसत. लांबलांब रहात. घाबरल्यासारखी. आणि नाही तरी त्याना जवळ घेतले की तिला एकदम भडभडून येई. त्या दिवशी असेच झाले. मधली लतू तिच्या कॉटवर चढून बसली. आईने हसावे. म्हणून लतूने आईनेच शिकवलेले गाणे म्हणून दाखवले. सुषमेला लतूचे फार कौतुक वाटले. लतूचे गाल कुरवाळत ती म्हणाली,

"लतू, किती ग लक्षात ठेवले आहेस हे गाणे—विसरली नाहीस."

लतू टाळ्या पिटत म्हणाली, "आईने शिकवलेले काय विसरतात काय? नाहीच मुळी! आणि गाण्यात तुझं नांव आहे किनई आई? आई, सुषमा म्हणजे काय ग?"

"तुझ्या गाण्यात चांदण्याची शोभा आहे न, ती" पहाटेच्या फिक्कट चंद्रकोरीसारखी सुषमा हसली. गहिवरून बोलून गेली,

"माझी पण ठेवशील ना आठवण अशीच?"

लतू एकदम खाली बसली. अविश्वासू आवाजात बोलली, "आई, तू गावाला जाणार आहेस का? तेव्हासारखी मी नाही हं एकटी राहणार—मी येणार तुझ्याबरोबर."

सुषमा रडे दाबीत म्हणाली, "नाही बेटा—जा तू आता खेळायला."

तेवढ्यात लतूचे बाबा आले. पलगावर टेकत म्हणाले, "असं काय करतेस—"

त्याचा हात हातात घेऊन तिने डोळे मिटून घेतले. आजवर ॲनिमिक कंडिशन म्हणून फसवत फसवत साऱ्यांनी तिला इथवर आणले होते. पण परवाचे व्हरांड्यातले डॉक्टरांचे बोलणे तिने स्पष्ट ऐकले. होते. पोटात कॅन्सर असल्याची शंका खरी ठरली होती.

मागे सहज मासिक वाचता वाचता तिने कॅन्सरबद्दलची माहिती वाचली होती. नवऱ्याशी त्याबद्दल बोलताना म्हणाली होती—"हा कॅन्सर म्हणजे अगदी कॅन्सर कॅन्सर नो ॲन्सर दिसतोय्."
तेव्हा मनीमानसी नव्हते की हाच अजगर तिलाही गिळून घेईल. आणि तिच्या पुरते लक्षात आले होते. ते कळल्यापासून—त्या विशिष्ट दिवसापासून—मनोहर—तिचा नवराही—खरे म्हणजे खचला होता. आताशा तो फार कमी बोले. जवळ यायचे टाळी. आला तरी नजर टाळीत, भरल्या आवाजाने बोले. रात्र रात्र त्याच्या खोलीत दिवा जळे. परवा अस्वस्थ वाटत होते—पोट दुखत होते. म्हणून ती उठून बसली. मोरीवर जाऊन आली. येता येता सहज त्याच्या खोलीत डोकावली. दिवा ढणढणत होता. छातीवर पालथे पुस्तक होते. अन् तो आतल्या आत रडत होता. हलक्या पावलांनी ती जवळ गेली. तो दचकला.

"सुशा तू—तू कशाला आलीस—" त्याने तिला हाताला धरून तिच्या खोलीत आणले. बळेबळे तिला थोपटत तो म्हणाला, "झोप".

सुषमेला वाटले, त्याला ओढून छातीवर घ्यावे. पण तेवढ्यानेही जीव घाबरे. ती हळूच म्हणाली, "तुमचे उभे आयुष्य मी दुःखी केले".

त्याने तिच्या तोंडावर हात ठेवला—"असे बोलू नकोस सुशा—"

"नुसते तुम्ही 'सुशा' म्हटलेत तरी किती जवळ आल्यासारखे वाटते हो". त्याच्या मांडीवर हात ठेवत ती कुजबुजली.

खोटेखोटे हसून तो म्हणाला, "दोन








—आ. ना. वाळिंजकर

# पॉलरिस पाणबुडी



***आपल्या नौदलात परंपरागत पाणबुड्या दाखल होत असतानाच अत्याधुनिक 'पोलरिस' पाणबुडीच्या सामर्थ्याचे हे दर्शन....***

**युद्धामध्ये** जी काही आक्रमक शस्त्रे म्हणून समजली जातात, त्यामध्ये पाणबुड्यांचा प्रामुख्याने उल्लेख करावा लागेल. आपल्या आरमारात पाणबुड्या असाव्यात किंवा असू नयेत, यावद्दल बरेच मतभेद राजकर्त्यांत १९६२ सालापर्यंत होते. कारण काय तर, भारत हे शांतताप्रेमी राष्ट्र आहे; त्याला कोणावरही आक्रमण करावयाचे नाही; तेव्हा आपल्या किनाऱ्याचे संरक्षण करण्याकरता पाणबुड्यांचा उपयोग काय ? अशा तऱ्हेचा युक्तीवाद केला जात असे. परंतु आता परिस्थितीत बदल झाल्यामुळे त्याना वास्तववादी धोरण स्वीकारावे लागले आहे. म्हणून लवकरच आपल्या आरमारात डिझेल–इलेट्रिक पाणबुड्या येणार आहेत. परंतु पाणबुड्यांत आता बऱ्याच सुधारणा झाल्या आहेत. जगामध्ये सर्वश्रेष्ठ आरमारी सामर्थ्य असलेले अमेरिका हे राष्ट्र आहे. त्यांच्या आरमारात अत्याधुनिक अशा पोलरीस जातीच्या पाणबुड्या आहेत. तेव्हा त्यांच्या विषयी आपण माहिती घेण्याचा प्रयत्न केल्यास तो उद्‌बोधक ठरेल.

पाणबुडीचा पहिला आविष्कार म्हणजे 'यू-बोट' असे म्हणता येईल. ह्या यू-बोटीचा प्रथम उपयोग पहिल्या महायुद्धात जर्मनीने दोस्त राष्ट्रांविरुद्ध सर्रास करून इंग्लंड व फ्रान्सच्या व्यापाराला जबरदस्त तडाखा दिला. नंतर दुसऱ्या महायुद्धातसुद्धा त्याचीच पुनरावृत्ती जर्मनीने केली, आणि इंग्लंड व फ्रान्सला नाक मुठीत धरावयास लावले. अशा तऱ्हेने पाणबुडीचे अन्योन्य महत्त्व जर्मनीने जगास पटवून दिले. तेव्हापासून जगातील बड्या राष्ट्रातून आपापल्या आरमारात पाणबुड्या ठेवण्याची एक प्रकारची अहमहमिका लागली.

## पोलरिस पाणबुड्यांची निर्मिती

१९५४ सालापर्यन्त सर्व पाणबुड्या ह्या डिझेल-इलेट्रिकवर चालणाऱ्या होत्या. परंतु १९५४ सालानंतर एक क्रांतीकारक बदल पाणबुडीत घडून आला. तो म्हणजे अणुइंधन होय. अणुइंधनावर चालणारी पहिली पाणबुडी अमेरिकेने तयार केली. ती नॉटिलस होय. तिचा सागरी वेग ताशी २० मैल होता. व त्या पाणबुडीने उत्तर ध्रुवाच्या जवळ बर्फाच्या पृष्ठभागाखालून यशस्वी संचार केला हे तिचे वैशिष्ट्य होय. पुढे काही दिवसानी अशा तऱ्हेच्या पाणबुड्या 'पोलरीस' ह्या अण्वस्त्रानी सुसज्ज केल्या, म्हणून त्याना पोलरीस पाणबुड्या असे म्हणतात. ह्या पोलरीस पाणबुड्या तीन प्रकारच्या आहेत. पहिल्या प्रकारची पाणबुडी ही 'जार्ज वॉशिंग्टन' या नांवाने ओळखली जाते. तिची लांबी ३८० फूट असून वजन ५९०० टन आहे. पहिल्या पाच पोलरीस पाणबुड्या ह्या जॉर्ज वार्शिग्टन पद्धतीच्या बांधल्या गेल्या. पहिली पाणबुडी ३० डिसेंबर १९५९ साली प्रथम अमेरिकेच्या नौदलात दाखल करण्यात आली. तसेच त्या पाणबुड्या 'पोलरीस अ-१' ह्या क्षेपणास्त्रानी सुसज्ज आहेत. दुसऱ्या प्रकारची पाणबुडी ही 'एयान ऐलन' ह्या नांवाने ओळखली जाते. तिची लांबी ५१० फूट असून वजन ६९०० टन आहे. नंतरच्या पांचही पाणबुड्या 'एयान एलन' वर्गातल्या बनविल्या गेल्या व त्या सर्व 'पोलरीस अ-२' क्षेपणास्त्रानी सुसज्ज केल्या. तिसऱ्या वर्गाच्या पाणबुड्या 'लाफाएटी' या नांवाने ओळखल्या जातात. त्या पहिल्या दोन वर्गापेक्षा जास्त अत्याधुनिक आहेत. 'लाफाएटी' पाणबुड्यांची लांबी ४२५ फूट असून वजन ७३२० टन आहे. त्या प्रकारच्या सर्व पाणबुड्या 'पोलरीस अ-३' क्षेपणास्त्रानी सुसज्ज केल्या आहेत.

## अणू-पाणबुडीवरील जीवन

पाणबुड्याना सावधपणे पहारा करता यावा म्हणून साठ दिवस











चिवचिवणाऱ्या चिमण्या दिल्यास–एक गोजिरवाणा ससा दिलास–आणखी सुख सुख ते काय असते?" पण एवढ्यानेही त्याचा गळा दाटून आला.

"मला फार भीति वाटते हो" –सुषमा गलबलून म्हणाली.

"वेडी आहेस तू अगदी. झोप–तुला झोप लागेपर्यंत मी तुझ्याजवळ बसतो."

"झोप लागेपर्यंत......!" सुषमाला पुन्हा ते दृष्य दिसले. मघांचे–नेहमीचे–सावलीसारखा तिचा पाठलाग करणारे.

"मी तुम्हाला आठवते का हो–तुमच्या बरोबर फिरायला येणारी, घरभर काम करीत वावरणारी?"

"हो–हो सगळे आठवते ग. पण तू झोप बघू आता. एकदोन दिवसात आपण मुंबईला जाऊ या. मुंबईचे डॉक्टर तुला लवकर बरं करतील."

सुषमा चरकली. छातीवरचे पालथे पुस्तक, ढणढणता दिवा, आणि मघाचे त्याचे आतल्याआत धुमसणे. आता तिला पुरते समजले. त्याचा हात घट्ट धरीत सुषमा कापऱ्या स्वरात म्हणाली,

"मुंबईला कशाला–ऑपरेशन करणार–माझे? नको हो नको–मला इथेच राहू द्या नं–इथेच राहू द्या."

मनोहर घट्ट मनाने तिला चुचकारत होता. "हे बघ सुशा–तुला लवकर वरं व्हायचय् ना? असं नाही करायचं. मग माझी सुशा पुन्हा बकुळीचा गजरा घालून फिरायला येईल. बकुळीसारखीच सदा हसरी आणि सुगंधाने वेढणारी...."

सुषमा खोल हसली. ते नेहमीचे सावलीसारखा पाठलाग करणारे दृष्य आता मुंबईपर्यंत येणार—आता सुटका नाही. सुषमेला वाटले, देवाला नेमकी मीच कशी दिसले? मीच–मीच.....मी माणूस आहे–मग मी स्वार्थी कां नसावे? प्रत्येकाच्या मनात प्रथम स्वार्थच येत असेल का? तिला आठवले, मागे–खूप मागे, ती कामधाम करीत असे तेव्हाची अंधुक आठवण–त्या दिवशी फार तारांबळ झाली होती. डबेवाला यायची वेळ झाली होती–आणि उकळत्या आमटीत खिडकीतून भुरंदिशी झालेले चिमणीचे पिलू पडले. तडफडून मेले. प्रथम मनात चर्रर झाले–पण लगेच प्रश्न पडला तो डब्यात आता पोळीबरोबर काय द्यायचे हा! मग दोन मिनिटानी–मिनिटे कसली, युगे म्हणायला हवे–मनं चुकचुकले, अरेरे! बिचारी चिमणी हकनाक मेली!

ती चुकून मोठ्याने वरळल्यासारखे बोलली–"माझ्या आमटीत ती चिमणी मेली म्हणून हे असे झाले का हो?"

मनोहरला काहीच उलगडा झाला नाही. तो तिला थोपटतच राहिला. म्हणाला, "मी आहे हं– तू शांत–झोप आता."

त्याचे मन झाकाळून गेले. डोळ्यातल्या झडीला खळ नव्हता. त्याची बकुळी अंधारात सतत बुडत चालली होती. भिंतींवर हातांच्या सावल्या फांद्यांसारख्या एकमेकात गुंतल्या होत्या. थरथरून त्याला आर्जवत होत्या,

"पाळंमुळं फार खोल रुजली आहेत रे – उन्मळून पडायचे तर इथेच पडू दे. इथेच काय व्हायचे ते होऊ दे......" ★★★

[पृष्ठ १५ वरून—मिरर]

गोंडस आहेत. सगळ्यांच्याच चेहऱ्यावर कुरळ्या बटा उडताहेत. भोवतीचा आसमंत उजळल्यासारखा वाटतो.

"अहो, ह्या महिन्याला साडी हवी मला. जुन्या दोन्ही विटल्या. त्या कोपऱ्यावरच्या सिंध्याच्या दुकानात कटपिसेसचा नवा स्टॉक आलाय्. मी बघून आले काल. तीन तीन वाराचे दोन तुकडे जोडले की चांगली मळखाऊ साडी तयार होते."

"छान."

"छान काय? तुम्हाला सारंच छान असतं. अस्सं, होय, छान, घेऊ या की, कर की आणि जा की त्याशिवाय दुसरे शब्दच नाहीत काहो तुमच्याकडे ?"

"अं ?....आहेत, आहेत की !"

"मग त्यांना काय बंद करून ठेवलंय् कडी कुलुपात ? कधी धड बोललात माझ्याशी, चार गोष्टी सांगितल्यात सुखदु:खाच्या? नेहमी पट्टा सुरू असतो तो माझाच."

"माझ्याऐवजी तूंच बोलून घेते की !"

"बोलून घेते की ! नशीब, दोन अक्षरी का होईना, शब्द निघतो तोंडून तुमच्या."

मी अधिक बोलत नाही. समोरील बायांची बोलणी सुरू असतात. नवीन रेशमी साडी काऊंटरवर टाकल्यासारखी वाटते. एकजण दुसरीच्या साडीचा काठ धरून पोत बघत असते, दुसरी पर्समध्ये काही शोधत असते. तिसरी आपल्या आंबाड्यावरची अबोलीची वेणी आंगठा आणि तर्जनीनं चाचपीत असते. मधूनच मुक्त हास्य उमटतं. सायलीचा वास दरवळत आल्यासारखा वाटतो.

"तुमची सदा न् कदा त्या खिडकीशी उभे राहाण्याची काय सवय हो ?"

"अं ? सवय ? नाही... उगाच काहीतरी ..."

"उगाच काय, नक्कीच काही तरी हेतु असतो तुमचा. कमी बोलणारी माणसं आतल्या गांठीची असतात असं म्हणतात ते उगाच नाही."

"म्हणजे ?"

"म्हणजे काय ते चांगलं कळतं तम्हाला. सदा न् कदा खिडकीतूम पुढल्या बिऱ्हाडांवर नजर लावून असता. असं टक लावून बघणं हे चांगल्याचं लक्षण आहे कां ?"

"शी ! भलतंच काय बोलतेस."

"ठीक बोलतेय्. आता त्या बायांकडे टक लावून बघताना थोडी तरी लाजलज्जा ?"

"हे बघ......"

"काही बघायचं नाही मला."

"अग पण......"

"एक शब्द बोलू नका. आजपर्यंत ह्या तुमच्या सवयीकडे दुर्लक्ष केलं मी. पण आता हे थेर चालणार नाहीत. आजच ती समोरची बाई भांडली माझ्याशी. म्हणाली तुझ्या नवऱ्याला आवर. घराच्या खिडकीतून सारखा माझ्याकडे बघत असतो. घरात वावरताना बाई माणूस..."

पुढ ऐकू येत नाही.

आताश्या खिडकीत उभा राहण्याची हिंमत होत नाही. वाटतं तिचा रंग विटला आहे. पडदा फाटला आहे. कॅमेऱ्याचा फोकसिंग मिरर आपल्या ठिकाणाहून घसरला आहे; त्याला तडा गेला आहे. दुरुस्त करण्याची इच्छा नाही...तो पुन्हा असाच फुटेल हे माहित आहे......

●●●








किंवा त्यापेक्षाहि जास्त दिवस पाण्याच्या पृष्ठभागाखाली राहणे भाग पडते. म्हणूनच एकंदरीत पोलरीस नौसैनिकाचे तेथील जीवन वैशिष्टचपूर्ण असते. एका पाणबुडीवर १२४ नौसैनिक व १२ अधिकारी असतात. जेव्हा पोलरीस पाणबुडी पाण्याच्या पृष्ठभागाखाली जाते, तेव्हा ती आपल्याबरोबर ४००० पौंड मांस, १००० पौंड खारवलेले डुकराचे मांस, ९६० डझन अंडी, ३००० पौंड साखर, १२०० पौंड कॉफी व १२० पौंड चहाची पावडर इत्यादि सामान घेते. त्यामुळे त्यांचा दैनंदिन कार्यक्रम मजेत पार पडतो. या दैनंदिन कार्यक्रमात तीन वेळा भरपूर जेवण, २ वाजता सुप तसेच जेवणानंतर ठराविक वेळी कॉफी व आइस्क्रीम दिली जाते.

त्या सर्व पाणबुड्यात विविध प्रकारची शेकडो टनाची यंत्रसामुग्री बसविली आहे. त्यात प्रामुख्याने अॅटोमिक रिअॅक्टर, जनरेटर, वातानुकुल वातावरण निर्माण करण्याकरिता तसेच अशुद्ध हवा बाहेर फेकण्याकरिता खास यंत्रे बसविलेली आहेत. कपडे धुण्याकरिता व इस्त्रीसाठी तसेच जेवण तयार करण्याकरिता वेगवेगळ्या प्रकारची यंत्रसामुग्री त्यात आहे. करमणुकीकरिता आधुनिक सोयीनी सुसज्ज असे चित्रपटगृह सुद्धा आहे. 'स्कॉपशन' ही पाणबुडी पाण्याखाली ७० दिवस राहलेली आहे, तर 'ट्रिटान' ह्या पाणबुडीने सतत ८४ दिवस पाण्याखाली राहण्याचा विक्रम केला आहे. पाणबुडी बरेच दिवस पाण्याच्या पृष्ठभागाखाली राहत असल्यामुळे नौसैनिकाना रात्र आहे की दिवस आहे हे ओळखण्याकरिता निरनिराळ्या रंगाचे दिवे लावले जातात. नेहमीचा शुभ्र दिवा हा दिवस उजाडल्यावर लावला जातो तर तांबड्या रंगाचा दिवा रात्रीची वेळ झाल्यावर लावला जातो. अशा तऱ्हेने दिवस व रात्रीमधला फरक त्यामध्ये असलेल्या नौसैनिकाना सुचविला जातो. नियमाप्रमाणे ठराविक वेळी चित्रपट दाखविला जातो. नौसैनिक आळीपाळीने आपापल्या कामावर हजर राहतात.




"हो घ्या आपली 'संग्राम गीते!' युद्धबंदी करार झाल्यामुळे सध्या आम्हास 'शांति–गीते' हवी आहेत!"

## ८२६० कोटींचे अंदाजपत्रक का ?

अमेरिका १९६७ अखेर ४१ पाणबुड्या बांधून-तयार करणार होती. पोलरीस क्षेपणास्त्रासहीत त्यांचा खर्च ८२६० कोटी रुपये येणार होता. एका पाणबुडीत १६ पोलरीस क्षेपणास्त्रे असतात. अॅटलांटिकमध्ये ह्यांचे तळ स्कॉटलंडजवळ होलीलॉक, स्पेनमध्ये होता, साऊथ करोलीना, व मेलव्हेली इत्यादि ठिकाणी आहेत. तर पॅसिफिकमध्ये पर्ल हारबर, ग्वॉम व हवाई इत्यादि ठिकाणी आहेत.

'अदृश्यता व गुप्तता' ही पाणबुडीची दोन महान अस्त्रे आहेत. जर शत्रूला नक्की ठिकाण समजले नाही, तर तो तिच्यावर परिणामकारक मारा करू शकत नाही. 'ट्रिटान' ही पाणबुडी सतत ८४ दिवस पाण्याखाली राहून जगाचा फेरफटका करू शकते. पाणबुड्यांच्या वेगातही फार मोठा बदल झाला आहे. दुसऱ्या महायुद्धात पाणबुडीचा पाण्याखालील प्रवासाचा सागरी वेग ताशी १५ ते १८ मैल होता. परंतु आता तो ताशी ३० सागरी मैलापेक्षाही जास्त आहे. 'स्कीपजॅक' ही जगातील सर्वात वेगवान् पाणबुडी समजली जाते. तिचा सागरी वेग ताशी ३५ मैल आहे. त्याचप्रमाणे दुसऱ्या महायुद्धात पाणबुडी जास्तीत जास्त ३०० ते ५०० फूट खोलीतून प्रवास करीत असे आता त्यामध्ये बऱ्याच सुधारणा झाल्यामुळे ती आता ९०० ते १५०० फूट खोल प्रवास करू शकते. परंतु अमेरिकन नौदलाला असा विश्वास वाटतो की काही वर्षात १९७०–८० च्या दरम्यान अमेरिकेची पाणबुडी ४००० फूट खोल प्रवास करू शकेल. व तीच जगातील खोल समुद्रातून प्रवास करणारी एकमेव पाणबुडी ठरेल. म्हणून सावधपणे खोल समुद्रातून गुप्तपणे केलेली टेहळणी ही फार महत्त्वाची असते; व हेच पाणबुडीचे मुख्य उद्दिष्ट असते. एकदा पाणबुडीने समुद्रात बुडी मारली की तिची टेहळणी पूर्ण झाल्याशिवाय ती समुद्राच्या पृष्ठभागावर येणार नाही. जेव्हा जरुरी भासेल तेव्हा पेरिस्कोपच्या साहचाने निरीक्षण करून तशी जरुरी भासल्यास ती वर येऊ शकते.

त्या पाणबुड्या इतक्या प्रबळ व शक्तिमान आहेत की शत्रूला कोणतेही साहसी मोहीम घेताना शंभर वेळा विचार करावा लागेल. व त्यांचा वचक शत्रूवर नेहमी राहील. म्हणूनच त्याना नेहमी जागृत राहावे लागते. आर्टिक महासागर नौकायानाच्या दृष्टीने कमी महत्वाचा आहे. परंतु लष्करी डावपेचाच्या दृष्टीने तो अत्यंत महत्वाचा आहे. सध्या आर्टिक महासागरात आरमारी वर्चस्व स्थापन करण्याचा बड्या राष्ट्रांचा प्रयत्न चालू आहे. कदाचित् तिसरे महायुद्ध उद्भवलेच तर अमेरिका पाणबुड्यांच्या साह्याने रशियाचा उत्तरेकडील मार्ग तोडून त्याला शह देण्याचा प्रयत्न करील. परंतु सध्यातरी शास्त्रीय संशोधनाच्या दृष्टीने त्यांचे फार महत्त्व आहे. वर सांगितले आहे की नॉटिलस या पाणबुडीने बर्फाच्या पृष्ठभागाखालून प्रवास करून एक जागतिक विक्रम केला आहे. त्याचा संशोधन कार्याकरिता जरूर उपयोग होईल. व उत्तर ध्रुवाकडील बरीच माहिती संशोधन कार्याकरिता उपलब्ध होईल.

अनुक्रमणिका





## रशियन अणु-पाणबुडी

आरमारी सामर्थ्याच्या बाबतीत अमेरिकेच्या नंतर दुसरा क्रमांक रशियाचा लागतो. आज जगात ही दोनच बलाढ्य अशी राष्ट्रे आहेत, की ज्यांचे आरमारी सामर्थ्य इतर कोणत्याही राष्ट्रापेक्षा वरचढ आहे. परंतु काही वर्षातच अमेरिकेच्या आरमारी सामर्थ्याची बरोबरी फक्त रशियाच करू शकेल असा अमेरिकेचा अंदाज आहे.

अणुइंधनावर चालणारे लेनिन नांवाचे पहिले व्यापारी जहाज रशियाने १९५७ साली बांधले. त्यानंतर चार वर्षानी अणुइंधनावर चालणारी पहिली पाणबुडी तयार केली. आतापर्यन्त रशियाने अणुइंधनावर चालणाऱ्या २५ ते ३० पाणबुड्या तयार केल्या असून त्या प्रत्येक पाणबुडीमध्ये ४ ते ६ क्षेपणास्त्रे ठेवण्याची तरतूद आहे.

डिझेल-इलेक्ट्रिकवर चालणाऱ्या पाणबुड्यांमध्ये योग्य ती दुरुस्ती करून त्या अणुइंधनावर चालणाऱ्या पाणबुड्यांत बदल करता येतात. सोव्हिएत रशियाजवळ डिझेल-इलेक्ट्रिकवर चालणाऱ्या पाणबुड्यांची संख्या १९६० दरम्यान ४५० होती. ती त्यानी १९६३ साली ४०० पाणबुड्यांच्या आसपास आणून ठेवली. यावरून आपल्याला असे दिसून येईल की दिवसेंदिवस रशियाचे धोरण हे पोलरीस पद्धतीच्या पाणबुड्यावर राहील. पाणबुड्यांचे महत्त्व अन्योन्य आहे म्हणूनच आपल्या आरमारात रशियाने पाणबुड्यांचा भरणा केला आहे. पाणबुडी आक्रमक शस्त्र असल्यामुळे शत्रूचे समुद्रावरील दळणवळण व व्यापार पाणबुड्यांच्या साह्याने उध्वस्त करता येतो. दुसऱ्या महायुद्धात जर्मनीने पाणबुड्यांच्या साह्याने दोस्त राष्ट्रांच्या २०० बोटी फक्त अॅटलांटिक महासागरात रसातळाला नेल्या यावरून त्यांच्या आक्रमक वृत्तीची व कार्यक्षमतेची कल्पना येईल.

## जगातील तुल्यबल आरमार

१९६२ साली 'क्युबा' प्रसंगी अमेरिकेच्या नौदलाने सहा पाणबुड्यांना चौवीस तासापर्यन्त पुढे सरकू दिले नाही त्यापैकी काहींना परत आपल्या तळाकडे जाणे भाग पडले. त्याच वेळी नार्वेजियन समुद्रात असलेल्या दोन पाणबुड्यांना व अलास्काच्या किनाऱ्याजवळ असलेल्या एका पाणबुडीला आपल्या तळाकडे परत फिरणे भाग पडले. अमेरिकेच्या बलशाली नौदलापुढे त्यांची दाद लागली नाही म्हणून, किंवा अन्य काही कारणामुळे म्हणा, त्यावेळी तरी रशियन पाणबुड्याना माघार घेणे भाग पडले. असे असले तरी देखील रशियाचे आरमारसुद्धा अमेरिकेच्या आरमारापेक्षा कमी दर्जाचे नाही. त्या दोन राष्ट्रांना परस्परांच्या सामर्थ्याची पूर्ण ओळख आहे. म्हणून कोणीही प्रथम आक्रमक हालचाल करून सर्वनाशाचा धोका स्वतःवर ओढवून घेणार नाही, असे सध्यातरी दिसते.

आरमारी सामर्थ्य असलेले तिसरे महत्त्वाचे राष्ट्र म्हणजे इंग्लंड होय. सोळाव्या शतकापर्यन्त स्पेनच्या आरमाराचे वर्चस्व सर्व जगभर होते. १५८८ साली स्पेनच्या आरमाराचा इंग्लंडच्या आरमाराने पराभव केला; त्या दिवसापासून इंग्लंडच्या आरमाराचे वर्चस्व टिकून राहिले. तसेच ते वर्चस्व टिकवून ठेवणे त्याना भाग












होते, कारण ब्रिटिशांचे साम्राज्य सर्व जगभर व विशेषत: आफ्रिका व अशिया खंडात पसरले होते. ते साम्राज्य टिकविण्याकरिता बलाढ्य आरमाराची जरुरी होती. परंतु दुसऱ्या महायुद्धात जर्मनीच्या आरमाराने विशेषत: त्यांच्या पाणबुड्यांनी ब्रिटिशांच्या आरमाराला असा जबरदस्त तडाखा दिला की त्यांच्या आरमारी सामर्थ्याचा डोलारा खाली कोलमडून पडला. महायुद्धानंतर इंग्लंडचे आरमारी सामर्थ्य कमी झाले, तसेच त्यांच्या साम्राज्याला सुद्धा उतरती कळा लागली.

अमेरिकेच्या साह्याने इंग्लंडने पाच पोलरीस पाणबुड्या बांधण्याचे ठरविले आहे. त्या सर्व पाणबुड्या पोलरीस अ-३, ह्या क्षेपणास्त्रांनी सुसज्ज केल्या जाणार आहेत. त्या पाणबुड्या बांधण्याचा अर्धा



खर्च अमेरिका सोसणार आहे; तर इंग्लंड पोलरीस अण्वस्त्र स्वत: तयार करणार आहे. एका पाणबुडीत सोळा पोलरीस क्षेपणास्त्रे असतील. आतापर्यन्त इंग्लंडने तीन पोलरीस पाणबुड्या बांधून आपल्या आरमारात सामील केल्या आहेत. उरलेल्या दोन पाणबुड्या १९७० सालापर्यन्त तयार होतील, असा अंदाज आहे. एका पाणबुडी अण्वस्त्रासहित बांधण्याचा खर्च ७०,०००,००० पौंड म्हणजे १४० कोटी रुपये आहे.

फ्रान्सचे आरमारी सामर्थ्य इंग्लंडच्या खालोखाल आहे. दुसऱ्या महायुद्धात जर्मनीने फ्रान्सचे कंबरडेच मोडल्यामुळे त्यांच्या आरमाराची आणखीच वाताहात झाली. परंतु दुसऱ्या महायुद्धानंतर फ्रान्सने आपल्या आरमारी पुनर्रचनेचा कार्यक्रम हाती घेतला. फ्रान्स एकूण पाच पोलरीस पाणबुड्या तयार करणार आहे. त्यापैकी एक तयार झाली असून ती त्यानी आपल्या आरमारात दाखल केली आहे. उरलेल्या चार पाणबुड्यांपैकी दोन पाणबुड्या १९७० सालापर्यन्त तयार होतील व राहिलेल्या दोन पाणबुड्या आणखी तीन वर्षात बांधून तयार होतील असा अंदाज आहे. म्हणजे १९७५ सालापर्यन्त पाच पोलरीस पाणबुड्यांचा ताफा क्षेपणास्त्रांनी सुसज्ज करण्यात येईल. तसेच प्रत्येक पाणबुडीवर सोळा क्षेपणास्त्रे असतील. त्या पाणबुड्यांवर १३५ अधिकारी व सैनिक असतील. टेहळणी व पहारा करण्याकरिता त्या पाणबुड्या ६० ते ७० दिवस बाहेर जाऊ शकतील.

## चीनने केलेली प्रगती

चीन हे दुसऱ्या महायुद्धापर्यन्त आरमारी सामर्थ्य नसलेले असे कमकुवत राष्ट्र होते. परंतु १९४९ च्या क्रांतीनंतर लालचीनने आपले लष्करी सामर्थ्य वाढविण्यास सुरवात केली. लालचीनजवळ ४० ते ५० डिझेल-इलेक्ट्रिकवर चालणाऱ्या पाणबुड्या असाव्यात, असा लष्करी तज्ञांचा अंदाज आहे. व त्या सर्व त्यांनी रशियाच्या मदतीने तयार केल्या आहेत. आता रशियाने चीनला मदत करण्याचे नाकारले असले, तरीसुद्धा चिनी तंत्रज्ञ आपल्या बुद्धीच्या कौशल्यावर आरमारी सामर्थ्य वाढविण्याची पराकाष्ठा करीत आहेत. म्हणून पोलरीस पद्धतीची पहिली पाणबुडी लालचीन बहुधा याच सुमारास तयार करू शकेल असेअमेरिकेच्या लष्करी तज्ञांचा अंदाज आहे. चीनजवळ आक्रमक पाणबुड्यांची संख्या दिवसेंदिवस वाढत चालल्यामुळे आपले सागरी दळणवळण व व्यापार पुढेमागे धोक्यात येण्याचा संभव आहे. आपण बऱ्याच वेळा वृत्तपत्रात वाचले असेल, की अरबी व बंगालच्या उपसागरात चीनच्या पाणबुड्या आपल्या व्यापारी जहाजांना दिसल्या, यावरून त्यांचे वास्तव्य या सागरात अधून मधून दृष्टीस पडते असे दिसून येईल. म्हणून आपले दळणवळण व्यापार व किनाऱ्याचे संरक्षणाकरता आपले आरमार व एकूण संरक्षण धोरण शत्रु कोणत्या आयुधानी सुसज्ज आहे हे पाहूनच आखले पाहिजे व त्या दिशेने जोरदार तयार केली पाहिजे तरच आपला निभाव लागेल. त्याही दृष्टीने आपल्याकडेही पाणबुड्या येणार आहेत हे एक सुचिन्ह होय. ●●●







# कॉलरची चिंधी

—शर्विलक



स्कॉटलंड यार्डचे इन्स्पेक्टर प्रमुख
रॉबर्ट चॅपमन

**नोव्हेंबर** महिन्यातील रखरखीत दुपार. ली नदी संथपणे वाहत होती. नदीच्या काठावरून दोन कामगार मजेत गप्पा मारीत चालले होते. इतक्यात नदीत काहीतरी तरंगत आहे असं त्यांच्या लक्षात आलं. ते दोघेही थबकले. ते दोघेही नजर रोखून त्या तरंगत्या वस्तूकडे पाहू लागले. पाहता पाहता ते एकदम दचकले कारण ती तरंगती वस्तु म्हणजे मनष्याकृती मुंडके होते!

लगबगीने ते जवळच्या पोलिस स्टेशनवर गेले. तिथे त्यानी हे वृत्त कथन केले.

नदीवर जाऊन पोलिसांनी ती तरंगती वस्तु बाहेर काढली. गोणपाटात बांधलेले ते एका स्त्रीचे प्रेत होते. त्या स्त्रीचा चेहरा छिन्नविच्छिन्न करून टाकण्यात आला होता. प्रथमदर्शनी असं वाटलं की पिस्तुलाच्या गोळीने तिच्या चेहऱ्यावर व डोक्यात मारा केला असावा. तिची ओळख पटू नये म्हणून मारेकऱ्याने खू दक्षता घेतली होती. त्याने देहावरच कपडे काढून टाकले होते; दागिने कानातले इअररिंग्सही काढून टाकले होते एवढेच नाहीतर त्या स्त्रीची दातांचं नकली कवळीही मारेकऱ्याने जागेव ठेवली नव्हती, न जाणो त्या कवळीच्य साह्याने दंतवैद्याचा शोध लागेल आणि मग त्या दंतवैद्याच्या मदतीने ती स्त्र कोण आहे हे समजून येईल.

ह्या सगळ्यावरून एक गोष्ट सि झाली. ती ही की मारेकरी महाबिलंद आहे.

प्रेत बांधण्यासाठी वापरण्यात आलेल गोणपाट व दोरी विशिष्ट अशी नव्हत घराघरातून असे गोणपाट व अशा दोऱ सर्रास वापरल्या जातात. म्हणजे इथे मारेकऱ्याने दक्षता घेतली होती.

१९४३ साली युद्धाच्या खाईत सापड लेल्या ब्रिटनमधील ही हकीगत आहे. का

अनुक्रमणिका





**सकाळी एक कुत्रे एका यत्कश्चित चिंधीशी बागडून स्वतःची करमणूक करून घेत होते. एका गुप्त पोलिसाची त्या खेळावर नजर पडली. आणि 'चिंध्या–सांपडतील तशा व तेथील गोळा करा' हा हुकूम त्याला आठवला. लगेच त्याने कुत्र्याकडून ती चिंधी हिसकावून घेतली आणि त्या चिंधीतून निर्माण झाला तो मृत्यूपाश . . .**

महिन्यापूर्वी लाखो ब्रिटिश नागरिक हिटलरच्या बॉम्बहल्ल्याला बळी पडले होते. त्या धकाधकीतलाच हा एक बळी असू शकेल! पण बेडफोर्डशायरच्या पोलिस-प्रमुखाने हे तर्कवितर्क केले नाहीत. त्याने तावडतोब हा सगळा प्रकार स्कॉटलंड यार्डला कळविला व त्यांची मदत मागितली.

इन्स्पेक्टर प्रमुख रॉबर्ट चॅपमन याना त्या कामगिरीवर नेमण्यात आले. दोन गुप्त पोलिसाना मदतनीस म्हणून घेऊन चॅपमन ह्या कामगिरीवर निघाले. डॉ. कीथ सिम्प्सन ह्या तज्ज्ञ डॉक्टरांचीही चॅपमननी मदत घेतली. प्रेत-तपासणी झाल्यावर डॉक्टरांनी सांगितले की कुठल्या तरी जड हत्याराच्या साह्याने ह्या बाईचा खून करण्यात आला आहे. खून करण्यापूर्वी तिचा गळा दाबण्याचा प्रयत्न झाला आहे पण तिला बंदुकीच्या गोळीने मरण लाभले ही चुकीची समजूत आहे. डॉक्टर पुढे म्हणाले, "ह्या बाईचं वय ३० ते ४० च्या दरम्यान असावं." ती बाई ५ फूट ३ इंच उंच होती, ती मध्यम बांध्याची होती व तिचे डोळे तपकिरी होते. तिला एक मूल असावे व दुसरे होऊ घातले होते.

मिळालेल्या ह्या त्रोटक माहितीवरून ह्या खूनाचा तपास करणे किती जिकिरीचे काम आहे हे चॅपमन यांच्या चाणाक्ष मनाला जाणवले. ह्या 'आई'ची ओळख कशी पटविणार? ज्या स्त्रिया बेपत्ता आहेत त्यातील 'आई' न झालेल्या स्त्रिया निकालात काढता येतील; मग उरलेल्या स्त्रियांचा शोध लावावा लागेल. परंतु हा शोध लावणे सोपे नव्हते कारण बॉम्बहल्ल्याच्या त्या दिवसात लोक विशेषतः स्त्रिया स्वतःचे संरक्षण करण्यासाठी एका गावाहून दुसऱ्या गावाला झरझर निघून जात होत्या!

तरी पण चॅपमन एका निर्णयाला येऊन पोहचले की ही स्त्री ब्रिटनमधलीच असावी व तीसुद्धा बेडफोर्डशायर ह्या परगण्यातीलच! म्हणूनच मारेकऱ्याने तिच्या खाणाखुणा नष्ट करण्याची धडपड केली आहे. त्याना असेही वाटले की शव ज्या दिवशी सांपडले त्याच्या आदल्या दिवशी ह्या स्त्रीचा खून करण्यात आला असावा; व त्याच दिवशी रात्री गोणपाटात शव घालून ते नदीत सोडून देण्यात आले असावे.

शव नदीत कसं सोडलं असेल? ह्याबाबत चॅपमन यानी असा तर्क केला की शव पाठीशी घालून ते नदीत सोडण्यासाठी मारेकऱ्याने दूरवर असा प्रवास केला नसावा, किंवा मोटारीत घालून ते नदीकाठी आणण्याची शक्यताही कमी. कारण वाटेत मध्येच कोणी मोटार अडविली तर? आजूबाजूला असलेली कारखान्यातील रहदारी व आजूबाजूच्या घरातील वर्दळ ह्यामुळे मारेकऱ्याने हे शव दिवसा नदीकाठी आणलेले नसून रात्रीच आणले असावे.

हे सगळे सुसंगत तर्क विचारात घेऊन चॅपमन यानी आपला निष्कर्ष पक्का केला की ही स्त्री गावातीलच असावी. परंतु सगळ्यात आश्चर्याची गोष्ट ही होती की अशा वर्णनाची कोणी स्त्री त्या गावातून बेपत्ता झाल्याची नोंद नव्हती. तरीही मिळालेल्या माहितीच्या आधारे चॅपमन यानी शोध सुरू केला. आपल्या सहकाऱ्याना त्यानी घराघरात चौकशीसाठी धाडले. चौकशी एकच: तुमच्या घरातून वा आळीतून एखादी बाई बेपत्ता झाली आहे का? तिचं वय ३०–४० च्या दरम्यान आहे व तिला एक मूल आहे. आहे ठाऊक तुम्हाला अशी बाई?

घराघरातून, कारखान्यातून, ऑफिसातून, बाजारातून, प्रत्येक ठिकाणाहून शोध सुरू झाला. रात्री थकूनभागून अधिकारी परत येत व म्हणत, 'अशी स्त्री नाही कुठे हरवली!'

शव सांपडले त्या दिवशी व त्याच्या आदल्या रात्री त्या नदीकाठावरील रस्त्यावरून जितके ट्रक वा मोटारी गेल्या, त्या ट्रक व मोटारीच्या सगळ्या ड्रायव्हर्सची जबानी घेण्यात आली. कित्येक सोल्जर्सना जबानीसाठी उभे करण्यात आले. पण ह्या सगळ्या जबानीतून काही निष्पन्न झाले नाही!

दिवसांमागून दिवस जात होते पण ह्या प्रश्नांना उत्तरे मिळत नव्हती—

हे शव कुठल्या स्त्रीचं आहे?

ती राहणारी कोठली?

तिचा खून कुठे करण्यात आला?

ह्या खूनामागे कोणता हेतु असावा?

चॅपमन मात्र निराश न होता, रोज शोध करण्यासाठी नवनवीन क्लृप्त्या योजीत होते. त्या बाईचा जो चेहरा विद्रुप झाला होता तो मेणाच्या साह्याने त्यांनी नेहमीसारखा केला. मग त्या चेहऱ्याचे फोटो त्यांनी वर्तमानपत्रातून प्रसिद्ध केले, त्याशिवाय सिनेमातून तो चेहरा पडद्यावर दाखविण्याची त्यांनी व्यवस्था केली.

चेहरा पाहिल्यावर त्या बाईला ओळखणारे अनेक निघाले. कोणी म्हणाले ती लंडनची आहे; कोणी म्हणाले ती स्त्री आयरीश असून कारखान्यात काम करताना आपण तिला पाहिली आहे. दुसरे सांगू लागले, ती वेल्सची आहे. तिसरे स्कॉटलंडचा हवाला देऊ लागले. ह्या प्रत्येक माहितगारांची माहिती अधिकाऱ्यांनी कसून अभ्यासली पण निकाल बाहेर आला नाही!

परंतु चॅपमनचा दृढ विश्वास ढळला नाही. ही स्त्री इथलीच—म्हणजे लूटन परगण्यातील—रहिवाशी आहे, हे त्याच्या मनातून जात नसे व तो आपल्या मदत-









नीसांना सांगे–"ही स्त्री कोण आहे? ह्या तपास आपण लावला की मारेकरी आपोआप सांपडेल!"

नवीन क्लृप्ती म्हणून मोठमोठ्या दुकानातील दर्शनी भागावर त्याने फोटो लावला व वर "MURDER" असे लिहिले, त्याखाली त्याने विनंती लिहिली, की जर कोणाला ह्या स्त्रीसंबंधी माहिती असेल तर त्याने ती तावडतोब पोलिस–खात्यात कळवावी.

महिना उलटून गेला! ह्या महिन्या-भरात फक्त एकच धागा मिळाला तो म्हणजे एक असा जुना बूट सांपडला की जो ह्या मृत स्त्रीच्या पायाला अगदी 'फिट्' बसला! पण कुठलाच मोची ह्या बुटावरून धागेदोरे उकलू शकला नाही.

नंतर चॅपमनने असा हुकूम काढला की लूटनच्या परिसरात रस्त्यावर, कच-ऱ्यात वा कुठेही कपडयाचे तुकडे वा चिंध्या सापडल्या तर त्या तावडतोब पोलिस स्टेशनमध्ये आणून द्याव्यात.

पोलिस–स्टेशनवर चिंध्यांचा हा ढीग होऊ लागला. प्रत्येक चिंधी स्वच्छ करून चॅपमनकडे तपासणीसाठी जाऊ लागली. चॅपमन आपल्या सूक्ष्म दृष्टीने ती चिंधी तपासीत. परंतु ह्यातून काहीच निष्पन्न होत नव्हते.

एकदा एक कॉलर फाटलेला काळा कोट कोणीतरी पोलिस स्टेशनमध्ये आणून दिला. मृत स्त्रीच्या अंगाला तो बरोबर होत होता. तो तिचाच असावा अशी शंकाही चॅपमन याच्या मनाला चाटून गेली. परंतु त्या कोटाला कॉलर नसल्यामुळे कॉलरवर असणारी लॉन्ड्रीची आद्याक्षरे वा इतर खुणा यांचा काहीच तपास लागला नाही.

चार महिने संपले! चॅपमनला अजून कोडे उलगडत नव्हते. मारेकरी आता हाती लागत नाही असं चॅपमनना वाटू लागलं व 'स्कॉटलंड–यार्ड'ला परतण्याच्या गोष्टी ते करू लागले.

इतक्यात आशेचा किरण चमकला! एक गुप्त–पोलिस सकाळी पोलिस–स्टेशनकडे जाण्यास निघाला असता वाटेत एक कुत्रा एका चिंधीशी खेळत असताना त्याला दिसला. 'प्रत्येक चिंधी गोळा करा' हा चॅपमनचा इशारा त्याला आठवला. तेव्हा त्याने कुत्र्याचा पाठलाग करून कुत्र्याला पकडले व कुत्र्याच्या तोंडातून ती चिंधी हिसकावून घेतली.

चॅपमन यानी ती चिंधी धुऊन स्वच्छ केली व तिचं ते निरीक्षण करू लागले. तेव्हा त्याना असं आढळून आलं की ती चिंधी म्हणजे मोठ्या ओव्हर–कोटाच्या कॉलरचा एक तुकडा आहे. आणि काय आश्चर्य जो कोट पोलिस–स्टेशनमध्ये आणून देण्यात आला होता त्या कोटाच्या कॉलरचा तुकडा नेमका कापलेला होता. चॅपमन यानी मिळालेला तो तुकडा त्या जागी बसवताच ती कॉलर पूर्ण झाली! ती त्याच कोटाची कॉलर होती. चॅपमन आनंदले. तो कोट कधीतरी लॉन्ड्रीत धुवायला टाकल्यामुळे मालकाची आद्या-क्षरे त्या कॉलरवर कुठे आढळतात की काय हे चॅपमन पाहू लागले. तो त्याना असे आढळून आले की आद्याक्षरे नाहीशी करण्याचा प्रयत्न करण्यात आलेला आहे. निरनिराळी रसायने वापरून त्यांनी ती आद्याक्षरे शोधून काढली व गावातील प्रत्येक लॉन्ड्रीमध्ये आता चौकशी सुरू झाली.

अनेक लॉन्ड्रीतून शोध करूनही नेमका पत्ता लागण्याची चिन्हे दिसेनात. शेवटी एका लॉन्ड्रीत शोध लागला. मालकाने नीट तपास करताच त्याला असे आढळून आले की लूटनमधील कॅरोलीन मॅंटन या स्त्रीचा हा कोट आहे व तो आपण काही महिन्यापूर्वी धुतला होता! ती स्त्री 'रीजेंट-स्ट्रीट'वर रहाते.

चॅपमन यानी धूर्तपणे पाऊल टाक-ण्याचे ठरविले. 'रीजेंट–स्ट्रीट' पोलीस-स्टेशनपासून जवळ होती. दारोदार चौकशी करताना त्या रस्त्यावरील सगळ्या घरांची चौकशीही झाली होती. त्या मृत स्त्रीचा फोटोही सगळ्यांना दाखविण्यात आला होता. तपासाअंती असंही समजले की मॅंटन कुटुंबातील दोन लहान मुला-नाही हा फोटो दाखविण्यात आला होता, पण फोटोतील स्त्रीला त्यांनी ओळखले नाही! नंतर असेही समजले की मिसेस् मॅंटन ही नवऱ्याला सोडून लंडनमध्ये रहात आहे. परंतु ह्यावद्दल संशय घेण्या-सारखं काहीही नव्हते कारण त्यापूर्वीही एकदा ती नवऱ्याला सोडून लंडनला गेली होती.

चॅपमन आता काळजीपूर्वक पाऊल टाकू लागले. ते स्वतः 'रीजेंट–स्ट्रीट'वर पाहणी करायला आले. तेव्हा एक लहान मुलगी रस्त्यावर खेळत होती. तिच्या चेहऱ्यात व मृत स्त्रीच्या चेहऱ्यात बरेच साम्य होते म्हणून त्यानी त्या मुलीला जवळ बोलावले व विचारले, "बाळ, तुझी आई कोठे आहे?" तेव्हा ती चिमु-रडी उत्तरली "खूप दिवस झाले ती लंडनला जाऊन." म्हणजे मृत स्त्री मिसेस् मॅंटनच ह्याची चॅपमन ह्यांना खात्री झाली. परंतु अजून भरभक्कम पुरावा मिळत नव्हता.

चॅपमन तडक मॅंटनच्या घरी गेले व त्यानी दार ठोठावले. चाळीस वर्षांच्या विल्यम मॅंटनने दरवाजा उघडला. तो नॅशनल फायर सर्व्हिसमध्ये लॉरी ड्रायव्हर होता व एक 'सज्जन असामी' म्हणून त्याचा लौकिक होता. चॅपमनने त्याला विचारले, "तुझी वायको कोठे आहे?" तेव्हा त्याने सांगितले की तिच्या बेताल वागण्यामुळे तिच्याशी त्याचे भांडण झाले व ती त्याला सोडून गेली. बॉंबहल्ल्याच्या वेळी आपण घराबाहेर नोकरीनिमित्त असताना आपली वायको तिच्या काही सोल्जर मित्राना घरात घेऊन बेताल वर्तन करीत असे. ह्यावावत तिच्याशी माझे भांडण झाले व २५ नोव्हेंबरला ती लंडनला गेली.

विल्यमने चॅपमनना आणखी खूप माहिती सांगितली. आपल्या वायकोची आई शेजारच्या इमारतीत राहते व तिला तिच्याकडून अनेक पत्रे आली आहेत. एक तर अगदी नुकतेच आले आहे. शेवटी





मॅंटन म्हणाला, "नदीत सांपडलेली स्त्री माझी बायको असावी असं मला वाटत नाही."

चॅपमन ह्यावर काहीच बोलले नाहीत पण आपल्याला तुझ्या सासूकडे घेऊन चल असं ते म्हणाले. त्यामागे चॅपमन यांचा हेतु ती पत्रे पाहण्याचा होता!

पत्रांच्या शिक्क्यावरून ती लंडनहून आली आहेत हे चॅपमनने ओळखले. ती पत्रे डिसेंबरच्या सुरुवातीला व फेब्रुवारी-मध्ये आली होती. ती आपल्या मुलीच्या हस्ताक्षरातीलच पत्रे, ह्याची आईला खात्री होती. म्हणजे मिसेस् मॅंटन लंडनमध्ये सुखरूप आहे तर! पण चॅपमन ह्याना हे पटत नव्हते!!

ते शांतपणे पत्रांचा अभ्यास करीत बसले; तेव्हा त्यांच्या लक्षात एक गोष्ट आली की पत्र लिहिणाऱ्याने प्रत्येक वेळी एकच चूक केली आहे. ती म्हणजे "Hampstead" चे स्पेलिंग दरवेळी **"Hamstead"** असे करण्यात आले आहे. म्हणजे दरवेळी **"P"** गाळण्यात आलेला आहे. दुसरे म्हणजे एकाही पत्रावर "Hampstead" मधील पत्ता नव्हता. चॅपमनची खात्री झाली की मॅंटन खोटे बोलतो आहे!

चेहऱ्यावर काहीही भाव न दर्शविता चॅपमन विल्यमला म्हणाले, "तुझ्या हस्ता-क्षराचा नमुना मला मिळू शकेल का?" विल्यमने ताबडतोब 'हो' म्हटले. यावर चॅपमन म्हणाले, "मी तुला काही वाक्ये सांगतो ती तू लिही". मग चॅपमननी दोन तीन वाक्ये तयार केली. त्या प्रत्येक वाक्यात "Hampstead" शब्द "हा असेल अशी त्यानी दक्षता घेतली.

विल्यमने लिहिलेली वाक्ये तपासून पाहताच चॅपमनच्या लक्षात आले की "P"शिवाय "Hamstead" लिहिण्यात आले आहे.

चॅपमन नंतर शांतपणे तेथून बाहेर पडले व सरळ एन. एफ. एस. च्या ऑफिसमध्ये गेले. तेथे त्यानी मॅंटन जेव्हा जेव्हा रजेवर गेला त्या तारखा मागितल्या. त्यानी त्या तारखा पाहिल्यावर त्यांच्या लक्षात आले की पत्रांवर असलेल्या लंड-नच्या तारखांशी त्या तारखा जुळत होत्या.

आता चॅपमन ह्यांची खात्री पटली की बायकोच्या हस्ताक्षरात खुद्द मॅंटननेच ती पत्रे लिहिली व रजा घेऊन तो लंड-नला जाई आणि तेथून पत्रे पोस्टात टाकी. मॅंटनला ताबडतोब अटक करण्यात आली!

नंतर चॅपमन पुन्हा मॅंटनच्या घरी गेले व ते सगळे घर तपासू लागले जेणेकरून मिसेस् मॅंटनच्या हाताचे ठसे मिळावेत. परंतु सगळे घर मुद्दाम दक्षता घेऊन स्वच्छ करण्यात आले होते. पण स्वयंपाकघरातील एका कपाटावर जी झारी होती त्या झारीच्या मुठीखाली अंगठ्याचा ठसा उमटला होता. त्या ठश्याचा फोटो काढण्यात आला. त्या अंगठ्याचा ठसा मृत स्त्रीच्या अंगठ्याच्या ठश्याशी तंतोतंत जुळला! मृत स्त्री म्हणजे मिसेस् मॅंटनच ह्याबद्दल आता संशय नव्हता.

मॅंटनवर खटला भरण्यात आला तेव्हा त्याने चॅपमनजवळ कबुली दिली—

"मी माझ्या स्वतःच्या प्राणांची पर्वा करीत नाही. माझ्या मुलांना योग्य ते संरक्षण मिळावं म्हणून मी जरूर ती व्यवस्था केली आहे. बायकोला ठार मारण्याचा माझा मुळीच उद्देश नव्हता पण रागाच्या भरात मी तिच्या चेहऱ्यावर खुर्चीने प्रहार केला आणि त्यामुळे ती तडकाफडकी मेली."

पुढे कोर्टात मॅंटनने असंही कबूल केलं की त्याचं त्याच्या बायकोशी नेहमी भांडण होत असे. ह्याचं कारण तिचा स्वैराचारी स्वभाव हेच होय.

"ती ज्या दिवशी मेली त्या दिवशी मी आम्हा दोघांसाठी चहा केला. चहा घेता घेता मी तिला सांगितलं की आज रात्री मला एका क्लबात कामानिमित्त जावं लागणार आहे. हे ऐकून मी नेहमीच असं करतो म्हणून ती मला शिव्याशाप देऊ लागली व रागाच्या भरात चहाचा कप तिने माझ्या तोंडावर फेकला. मी तिचा हात बाजूला केला कारण दुसरा कप माझ्या तोंडावर फेकण्याच्या विचारात ती होती. ती रागाने बडबडत होती— 'मी तुला आंधळा करीन..... मी तुला आंधळा करीन........' तिचा हा खूनशी आवेश पाहून मी भडकलो व जवळची खुर्ची घेऊन तिच्या चेहऱ्यावर मी जोराने प्रहार केला. एकदा.... दोनदा.....

ती किंचाळली व धडपडत खाली कोसळली. तिचा चेहरा रक्तबंबाळ झाला होता. मी तिच्या नांवाने साद घालू लागलो पण ती काहीच बोलली नाही. तिचं किंचाळणंही अकस्मात् थांबलं. तेव्हा माझ्या लक्षात आलं की मी तिला ठार मारली म्हणून. मुलांपासून ही सगळी गोष्ट लप-विली पाहिजे हा पहिला विचार माझ्या मनाला चाटून गेला. मी लगबगीने तो देह उचलला व कोळशाच्या खोलीत लप-वला. नंतर रक्त धुऊन टाकलं व तिचे कपडे वगैरे त्वरेने जाळून टाकले. तिच्या आईला पत्रे मीच लिहिली व लंडनला जाऊन ती पोस्टात टाकली. जेणेकरून तिच्या आईला वाटावं की तिची लेक अजून जिवंत आहे म्हणून. तिचा एक कोट मला मागाहून सांपडला तो मी कॉलर फाडून रस्त्यात फेकून दिला व कॉलरही दुसरीकडे फेकली.

मी तो देह गोणपाटात घातला व अंधार पडल्यावर सायकलवर तो गोणपाट बांधला व सरळ ली नदी गाठली. तेथे तो गोणपाट नदीत विसर्जित केला."

मॅंटनला देहान्त प्रायश्चित्ताची शिक्षा ठोठावण्यात आली !

परंतु लूटनच्या समस्त नागरिकांनी मॅंटनसाठी दयेचा अर्ज केला. त्यात त्यानी लिहिलं की मॅंटन हा खरोखरच एक सालस नागरिक आहे. त्याची बायको मात्र वाईट चालीची होती. शिवाय मॅंटनने तिचा खून व्हावा ह्या उद्देशाने मारलं नव्हतं. वगैरे. वगैरे.

अर्जातील सगळी हकीगत खरी अस-ल्याची खात्री झाल्यावर न्यायाधीशाने मॅंटनला जन्मठेपेची शिक्षा सुनावली.

नोव्हेंबर १९४७ रोजी मॅंटन तुरुंगा-तच मेला. ●●●



# एक नवाब आणि

—श्री. र. पुरोहित—

**एक साधा 'केशकर्तनकार' पण त्यानं नवाबालाही अगदी खूष करून भरपूर पैसा मिळविला अं !**

**उत्तर** भारतातील नवाब आपल्या विलासी व छंदिष्ट गोष्टीविषयी प्रसिद्ध आहेत. त्यातल्या त्यात लखनौ व अयोध्येचे नवाब तर विशेषच प्रसिद्ध आहेत. त्यांच्या पदरी नाना प्रकारचे लोक असत व ते नाना युक्त्या लबाड्या करून आपल्या तुंबड्या भरीत असत. अशाच एका नवाबाची व त्याच्या नापिताची ही सत्य हकिकत आहे.

नवाब नासिरउद्दीन हा अयोध्येचा नवाब होऊन गेला. त्याच्या वेळी ब्रिटिशांचे राज्य जवळ जवळ सर्व भारतात पसरलेले होते. ज्या संस्थानात त्यांचे प्रत्यक्ष राज्य नव्हते, त्या संस्थानात त्यांचे रेसीडेण्टस असत. त्यांच्या मार्फत मग इतर अनेक गोऱ्या अधिकाऱ्यांचा व क्वचित प्रसंगी कलावंतांचा प्रवेश या नवाबांच्या दरबारात होत असे. किंवा हे नवाब स्वतःच त्यांना आपल्या पदरी ठेवून घेत असत. नवाब नासिरउद्दीन हैदर याच्या पदरी पांच युरोपियन माणसे होती. ती म्हणजे एक त्याचा शिक्षक, एक ग्रंथपाल, एक जर्मन चित्रकार व वाद्यकार, चौथा त्याच्या रक्षकांचा कप्तान व पांचवा आणि विशेष महत्वाचा म्हणजे त्याचा गोरा न्हावी. या न्हाव्याचा रुबाब, तो नबाबाचा आवडता असल्यामुळे, वजीरापेक्षा जास्त होता, त्यामुळे दरबारातील सर्व लोक त्याला वचकून असत व नाइलाजाने मान देत असत. या स्वारीने राज्यकारभाराचे काही काम केले असेल तर शपथ. त्याने फक्त एकच गोष्ट केली ती म्हणजे स्वतःची तुंबडी भरण्याची. नबाबाच्या फाजील विश्वासामुळे म्हणा किंवा त्याच्या आळशीपणामुळे म्हणा किंवा विलासीपणामुळे म्हणा ही गोष्ट त्याला शक्य झाली. या न्हाव्याने इतका अलोट पैसा जमविला की, पुढे ह्या पैशाचे काय करावे अशी त्याला चिंता पडली.

या न्हाव्याचे नांव होते डीरसेट. हा न्हावी जहाजी छोकरा म्हणून एका जहाजावरून कलकत्त्याला आला. तरुणपणी लंडनमध्ये असताना केशभूषा कलाकार म्हणून तो चांगलाच वाकबगार झालेला होता. कलकत्त्याला आल्यावर आपला धंदा सुरू करावा असे त्याला वाटले म्हणन त्याने जहाजावरचे काम सोडले. या उद्योगात त्याला यश मिळाले व तो वराच प्रख्यात झाला. या धंद्याशिवाय कधी कधी तो हुगळी नदीच्या काठावर परदेशी माल विकण्याचा धंदा पण करीत असे. त्यामुळे "नदीतला व्यापारी" अशा टोपण नांवाने तो ओळखला जाऊ लागला. कलकत्त्याच्या वास्तव्याचा पुढे त्याला कंटाळा आला आणि ही स्वारी लखनौला आली. लखनौला झालेले त्याचे आगमन त्याला मोठे फलदायी झाले आणि त्यामुळे त्याच्या सबंध आयुष्याचा मार्गच बदलून गेला.

लखनौच्या नबाबाच्या दरबारात एक ब्रिटिश रेसिडेण्ट होता. तो मोठा चतुर व देखणा होता. फक्त त्याला एकच वैगुण्य होते व ते म्हणजे त्याचे केस चांगले नव्हते. त्याला आपल्या केसांच्या झुलपाना मूळचा चरचरीतपणा व देखणेपणा हवा होता आणि या कामासाठी तो एका









न्हाव्याच्या शोधात होता. कर्मधर्म संयोगाने या रेसीडेण्टची व त्या न्हाव्याची गाठ पडली व त्याने आपली अडचण त्याला सांगितली. न्हावी आपल्या धंद्यात वाकबगार असल्याने त्याने रेसीडेण्टच्या केसाना त्याला हवा तसा चरचरीतपणा व देखणेपणा आणून दिला व त्यामुळे त्याच्या चेहऱ्यात इतका बेमालूम बदल घडवून आणला कीं, तो एकदम खूष झाला. तेव्हा आपल्या देशातील असा हुशार कलावंत नवाबाच्या पदरी असावा असे त्याला वाटले व त्याने या न्हाव्याची वर्णी नवाब नासिरुद्दीनकडे लावून देण्याचे ठरविले.

या नवाबाचे विशिष्ट प्रकारचे सडसडीत व सरळ केस होते आणि जन्मात त्याना कुरळेपणा ठाऊक नव्हता ही गोष्ट त्या रेसीडेण्टला ठाऊक होती. त्याने नवाबाला सांगितले कीं, "तुम्हाला जशा प्रकारचे केस हवे आहेत त्या प्रकारचे बनवून देणारा एक न्हावी माझ्या माहितीत आहे. वाटल्यास त्याला तुमच्याकडे पाठवून देतो." नवाब या गोष्टीला तयार झाला. नवाबाची व न्हाव्याची मुलाखत झाल्यावर नवाबाने त्याला आपल्याला कोणत्या प्रकारचे केस हवे आहेत हे सांगितले व तसे जर बनवून दिले तर वाटेल ते इनाम आपण देऊ हे पण सांगितले. या न्हाव्याने त्या केसाना नवाबाला हवा तसा कुरळेपणा व वळण आणून दिले. त्यामुळे नवाबाची स्वारी एकदम खूष झाली. आता नवाबाची स्वारी खूष झाल्यावर मग काय बघावयाला पाहिजे? त्या न्हाव्यावर नवाबाने पैशाचा व मानसन्मानाचा नुसता वर्षाव केला. आपले फार वर्षाचे मोठे काम या न्हाव्याने केले व आपल्या चेहऱ्यात मोठा फरक त्याने घडवून आणला त्यामुळे या न्हाव्याला कोठे ठेऊ व कोठे नको असे त्या नबाबाला झाले. एवढयाने त्याचे समाधान झाले नाही म्हणून त्याने त्याला "सोफराझखान" अशी पदवी दिली. अशा रीतीने गोऱ्या साहेबाचा खानसाहेब झाला व त्याचा भाव भलताच वधारला. संस्थानातील सर्व लोक त्याला मुजरे करू लागले त्यामुळे तो शेफारून गेला. पूर्वीचा जहाजी छोकरा एक साधा न्हावी आता मोठा अधिकारी झाला. विनासायास संपत्तीचा ओघ त्याच्याकडे येऊ लागला. नवाबाचा आवडता व खास मर्जीतला म्हणून नबाबाकडे असलेले काम त्याच्या मार्फत होऊ लागले. त्यामुळे लांच खाण्यात तो तरबेज झाला आणि पैसे कमाविण्याचा सोपा मार्ग त्याला उपलब्ध झाला. नासिरुद्दीनसारख्या चैनी, विलासी व आळशी नवाबाला काय पाहिजे हे त्याने बरोबर हेरले होते. या नबाबाला परदेशी दारू व चैनीच्या वस्तू यांचा फार हव्यास होता. डीरसेटने या दोन्ही गोष्टींची खैरात करून हजारो रुपये गाठी बांधले.

नासिरउद्दीनने या न्हाव्याला अमर्याद मानमरातब दिले व त्याला फार लाडावून ठेवले. यामुळे त्याचा भाव व रुबाब इतका वाढला की, तो हक्काने नबाबाच्या जवळ बसून त्याच्या बरोबर खाना घेत असे. पूर्वी नोकराने फोडलेल्या दारूच्या बाटलीतले मद्य तो पीत असे. आता फक्त डीरसेटने फोडलेल्या बाटलीतलेच मद्य तो पिऊ लागला. विश्वास तर त्याच्यावर नवाबाचा इतका होता कीं, त्याच्या घरी बंद केलेल्या बाटलीतले मद्य तो घेत असे. कारण दुसरीकडचे मद्य जर आपण प्यालो तर त्यात आपल्या घरचे लोक विष टाकतील अशी त्याला सदोदित भीति वाटत असे, इतकी दहशत त्याने आपल्या स्वतःच्या जुन्या माणसांबद्दल घेतली होती.

एका यःकश्चित न्हाव्यावर टाकलेल्या विश्वासामुळे साहजिकच तो न्हावी हिंदुस्थानभर चर्चेचा विषय झाला. बंगालमधील "कलकत्ता रिव्ह्यू" या वर्तमानपत्राने या न्हाव्यावर निंदेचे पोवाडेच रचले पण एवढे झाले तरी ही स्वारी आपली मस्तच. जोपर्यंत त्याला पैसा मिळत होता तोपर्यंत त्याला असल्या निंदेची फिकीर करण्याचे कारणच काय होते? त्याचा आपला एकच खाक्या—"कोणी वंदा, कोणी निंदा, माझा तुंबडी भरण्याचा धंदा." सगळयात कठोर टीका "आग्रा आखबार" या पत्राने केली. परंतु सरावामुळे हे न्हावीबुवा इतके बेडर झाले होते कीं, वर्तमानपत्रात आपल्या विरुद्ध प्रसिद्ध होणाऱ्या टीकेला उत्तर देण्यासाठी या स्वारीने दरमहा शंभर रुपये पगारावर एक युरोपियन नेमला व त्याच्या मार्फत स्वतःवरील सर्व आक्षेपांचे त्याने खंडन केले.

इतिहासाने एवढीच अर्धवट हकिकत या न्हाव्याबद्दल नोंदून ठेवली आहे. लखनौ व आयोध्येच्या नवाबानी आपली अगणित संपत्ती दडपून ठेवून जसे आजतागायत कुतुहल निर्माण करून ठेवले आहे तसेच कुतुहल त्यांच्याच पैकी एका नबाबाच्या पदरी असलेल्या या न्हाव्याबद्दल दडपून ठेवले आहे व निर्माण करून ठेवले आहे. काय सांगावे पुढे मागे या नापिताचा समग्र इतिहास आपणास अवगत होऊन आणखीन् आश्चर्यकारक गोष्टी बाहेर येतील तोपर्यंत आपणाला एवढयाच हकिकतीबद्दल समाधान मानावयास हवे.

***



# .....त्या चा ना पि त




अनु. प्रा. श्री. र. भिडे

५

**आपल्याला योग्य वाटेल त्या पुरुषाची निवड करून त्याच्याशी सैरंध्रीचा विवाह लावून देण्याचा मनोदय कीचक न्यायासनासमोर प्रगट करतो. सैरंध्रीला ही गोष्ट अमान्य त्यामुळं ती चिडते. पुढं महालातील प्रणयकुंजा-जवळ बल्लव-सैरंध्री भेट झालेली बघून कीचक संतापतो. कीचक-बल्लव मुष्टि-युद्ध होते. सैरंध्री ते पहाते अन् कीच-काला आणखीन् तडाखे देण्यासाठी बल्लवाला उत्तेजन देते....**

[लांब लांब टांगा टाकत कीचक नृत्यशाळेत प्रवेश करतो. नृत्य-शाळेचा मोठा दरवाजा उघडतो नि तिथला दिवा लावतो, त्यामुळे नृत्यशाळेत सर्वत्र धूसर प्रकाश पडतो. आपल्या अंगावरची वस्त्रे झुगारून देऊन केवळ लंगोटानिशी तो आखाड्यात उडी मारतो. थोड्याच वेळात बल्लव व सैरंध्री प्रवेश करतात. बल्ल-वाने शरीराभोवती सैरंध्रीच्या लुगड्याचा एक धडपा गुंडाळला आहे. दात ओठ खाऊन आपल्या पिळदार शरीराची मोहिनी टाकत तोही तत्परतेने आखाड्यात झेप टाकतो. सैरंध्री दुरून हा सारा प्रकार पहात आहे, तिच्या डोळ्यात अश्रु तरळत आहेत. बल्लवाच्या झेपेनेच कीचकाचे नेत्र संतुष्ट होतात, नि त्याला झटकन् पूर्वीची–एका प्रसंगाची आठवण येते— ]

**कीचक**: तू कुस्तीचाही सराव ठेवलेला दिसतोस. आखाड्यात उडी घेतलीस तीही एका आकर्षक पवित्र्यात...छान...उत्तम आहे पवित्रा...(बल्लवाला आवळण्यापूर्वी सैरंध्रीला उद्देशून)...तू अशी इतक्या दूर कां उभी? जवळ ये.....माझ्याशी लढताना प्रोत्साहन मिळावं म्हणून तुझ्या शब्दाची त्याला कदाचित् आव-श्यकता भासेल! मी तुझ्यासारखं खोटं बोलत नाही..मी बोलतो त्याचप्रमाणं योग्य मार्गानंच लढतो—अशी तुझी प्रत्यक्ष खात्री पटवून देतो...ए हलकट पोरटे, अशी पुढे ये म्हणतोना!

[सैरंध्री यंत्राप्रमाणं पुढे पुढे सरकते. कीचक आणि बल्ल-वाची कुस्ती सुरू झाली असून ते विविध प्रकारचे पेच खेळत आहेत. कीचक बल्लवाचे गुद्दे मोठ्या कौशल्याने चुकवतो नि बल्लवाला गुद्दे देताना शरीराच्या कोणत्या भागावर प्रहार कर-णार आहे हे प्रथम सांगून मग प्रहार करीत आहे] आता..हा उजव्या जबड्यावर...हा डाव्या...हा डावा खांदा..आता उजवा..छाती..तुझ्या हृदयात अद्याप धडधड आहे का चालू? त्या दिवशी जसा माझ्या हृदयाचा एक ठोका चुकला होता..तसा कदाचित् तुझाही होण्याची शक्यता आहे..कारणं मात्र निराळी...



तुला ठार करायला फारसा वेळ लागणार नाही..परंतु मी तुला एवढ्यातच ठार करीत नाही.....तू कुस्तीगीर नसून एक क्षुद्र आचारी आहेस याची तुला कल्पना यावी म्हणून कुस्तीचा एकेक नमुना दाखवतो....लढ माझ्याशी! (कीचक बल्लवाच्या कमरेला हाताचा विळखा घालून उचलतो नि आखाड्याच्या एका कोपऱ्यात त्याला आदळतो. बल्लव धप्‌दिशी खाली कोस-ळतो. कीचक आपले हात झटकून पाठीमागे नेतो आणि बल्लवाच्या जवळ सावकाश मागे मागे जातो..एका लाकडी ओंडक्यावर बसतो....

सैरंध्री बल्लवाला प्रोत्साहीत करण्यासाठी त्याच्याजवळ जाते) तुझ्या नाजुक बायकी हातानं कुरवाळ त्याला! त्याला त्याची जरूर आहे...तुझ्या प्रोत्साहक शब्दांच्या अभावी तो इतका वेळ सुद्धा माझ्याशी लढू शकला नसता. नि तुला ठाऊक आहे की मी फक्त त्याच्याशी खेळत आहे...नि आता...(सैरंध्री बल्ल-वाच्या कानात काहीतरी सांगते–हे पाहून) त्याच्या श्वासातला वारा–जोर कमी झाला आहे म्हणून त्याच्या कानातून तूं छातीत हवा घालते आहेस काय? पोरी, त्यापेक्षा ह्या भेकडाच्या छातीत धैर्याचा थोडा भरणा कर...भल्या माणसा, ऊठ आता.. (बल्लव उठण्याचा प्रयत्न करतो परंतु पुन्हा खाली पडतो.) नाही जमायचं तुला....उद्या दुपारपर्यंत आता इथंच असा पडून रहा गप....पाहिजे तर ही कुरवाळेल तुला...सम्रा-टांच्या दरबारात नेण्याकरिता तुमच्यासाठी एक गाडी नि चार गडी धाडून देतो. ...रहा पडून....प्यायला पाणीबिणी हवं का? एखादा थंडसा फवारा..ठीक आहे. हा मी जातो (उर्मटपणे पाण्याचे एक भांडे बल्लवाजवळ आदळतो) ए पोरी, पाज त्याला थोडं पाणी, नि उद्यापर्यंत तो भीतीनं मरणार नाही अशी त्याची काळजी घे....बलाढ्य कीचक आपला अवयव नि अवयव अजूनही कुटून काढेल अशी भीतिदायक स्वप्न त्याला दिसतील

अनुक्रमणिका

(बल्लवाला लाथेने उडवत) गुलाम—माझ्याशी लढू पहातो आहे.. गेल्या पंचवीस वर्षांत या कीचकाला अपयश हा शब्दच ठाऊक नाही...शी...तुझी मला कीव येते.....

[जेथे कपडे काढून ठेवले होते तेथे जाऊन कीचक डाव्या हातावर कपडे ठेवतो आणि जवळच्या दरवाजाने आपल्या मंदिराकडे जाऊ लागतो. परंतु बल्लवाला कोंडून ठेवावे अशी कल्पना त्याच्या मनात येते नि म्हणून तो पुन्हा माघारी येतो. दरवाजाच्या अडसरावर हात ठेवून तो उभा रहातो न राहतो तोच बल्लव सावकाश उठतो नि गैरसावध कीचकाच्या पाठीवर झडप घालून त्याला जमिनीवर लोळवतो. कीचक स्वतःची सोडवणूक करून घेऊन बल्लवाला आपल्या बाहूत कवटाळतो नि त्याची मान पिरगळून त्याला आखाड्याच्या दुसऱ्या कोपऱ्यात ढकलून देतो. बल्लवाचे तोंड आखाड्याच्या खांबावर आदळते नि त्याच्या तोंडातून भळाभळा रक्त वाहू लागते नि तो जमिनीवर धाडकन् कोसळतो.]

(रागाने सैरंध्रीला) ए बटके! तुझ्या जाराचं हे वागणं योग्य आहे का? कोणत्याही रीतीने त्याच्या वागण्याचं तुला समर्थन करता येईल असं वाटत नाही मला. शरीराच्या कोणत्या भागावर मी गुद्दा मारत आहे हे मी प्रत्येक वेळेला पहिल्यांदा सांगतो. माझ्या या वागणुकीबद्दल माझ्या गुरूना नेहमीच आदर वाटतो. प्रतिस्पर्धी कोणत्याही दर्जाचा असला तरी मी न्याय्य रीतीनेच लढतो. (बल्लवास उद्देशून) पण तू जी माझ्या अंगावर आता झडप घातलीस त्यामुळं मी तुला योग्य प्रकारे वागवावं एवढी तुझी लायकी आहे असं मला वाटत नाही. पुन्हा एकदा तर तू असं करून पहा....म्हणजे स्वतःचे हात माखून न घेता मी तुला असाच्या असा जमिनीत जिवंत गाडून टाकतो की तुझ्या शरीराची, त्याच्या आकाराची खूण सुद्धा उरणार नाही. ए मासाच्या गोळ्या, नीट लक्षात ठेव! प्रेतासारखा पडून रहा इथं.....एक यःकश्चित् आचारी..नि कुस्तीच्या गप्पा मारतो आहे. (कीचक जाऊ लागतो तोच बल्लव कर्कश रीतीने ओरडतो).

**बल्लवः** थांब. जाऊ नकोस! मी कोण आहे हे तुला आता दाखवतोच. मी कोण आहे हे आठवत बसण्याची मला जरूर नाही. तुझ्या गुद्द्यांनी नि फेकींनी मला आता चांगली आठवण झाली आहे. तू गुरूचा उल्लेख केलास म्हणून मलाही माझ्या गुरूंची स्मृति झाली आहे. मला प्रार्थनापूर्वक गुरूंचे एकदाच स्मरण करण्यास अवसर दे! मी तरी काय अडाणी, या क्षणापर्यंत त्यांना पार विसरूनच गेलो होतो. थोडा दम धर. या इथंच मी तुला खऱ्या कुस्तीचा नमुना दाखवतो. तू न्याय्य रीतीनं लढतोस असं म्हणालास काय? मग माझ्याशी लढण्याची तुला जरूरच पडणार नाही अशी तुझी खात्रीच करून देतो. काय आहे का तयारी?

**कीचकः** (लीनतेने) तुझ्या गुरूंचं स्मरण? नि प्रार्थना?....एकदम कबूल....गुरूंचे स्मरण व्हायच्या आतच तू ठार होशील अशी माझी खात्रीच असल्याने मी तुला थोडा अवधी देतो. (तिरस्काराने) तुझे हे गुरु तरी कोण आहेत, ते कळू दे एकदा..तेही बहुधा तुझ्यासारखेच नीच कुलोत्पन्न, प्रतिस्पर्ध्याच्या गैरसावधपणाचा गैरफायदा घेऊन त्याच्या पाठीवर झडप घालण्याची विद्या शिकवणारे! म्हणे गुरु! तू, तुझे हे असले गुरु नि तुला मृत्यूच्या जबड्यात ढकलणारी ही हलकट स्त्री—तुमचा तिघांचाही धिक्कार असो!.....तरीसुद्धा मी तुला काही क्षणाचा अवधी देतो, आणि तुझा मृत्यु स्वतः पहातो. नीट विचार कर. मृत्यूला आपण होऊन तू आमंत्रण देत आहेस.

[बल्लव ज्या कोपऱ्यात उभा आहे तेथेच कीचक कपडे ठेवतो नि ठोकळ्यावर बसून बल्लव नि सैरंध्री यांच्याकडे तिरस्काराने पहातो. स्वतःशीच मत्सरयुक्त स्वरात] पहा ही वया कशी कुरवाळते आहे त्याला. नि मला मात्र गेल्या कित्येक वर्षांत कोणीच कुरवाळलं नाही....स्त्रीच्या प्रेमळ स्पर्शानं अशक्य गोष्टी शक्य करून दाखविणे पुरुषाला शक्य होते असं मी ऐकलं आहे. याचा बांधा तसा चांगला आहे नि कुस्तीचे थोडे डावपेच याला अवगत आहेतसं दिसतं...याला पाहताच पूर्वी कुणाला तरी—अगदी याच्यासारख्यालाच पाहिलं असावं असं वाटतं...या आचाऱ्याला ही दासी जशी कुरवाळत आहे तसं जर मला एखाद्या स्त्रीनं कुरवाळलं असतं तर... पण तिच्या अभावीही गेली पंचवीस वर्षं 'अजिक्य' हे विशेषण मी सार्थ करून दाखविलं आहे.. हा अगदी सावकाश येत आहे नि मला वाटतं ह्याचा हा अगदी शेवटचा दम असावा......

[कीचक सर्व शक्ति एकवटून उडी मारण्याच्या बेतात असता बल्लव काही क्षण प्रार्थना करतो आणि कीचकाला आवळण्यासाठी पुढे होतो. बल्लवाची प्रत्येक हालचाल नि अवयव यांचे सूक्ष्म निरीक्षण करणाऱ्या कीचकाला अशाच बांध्याचा नि अशाच चालीचा कोणी तरी पूर्वी पाहिल्याचा भास होतो...नि आता पुढे काय होणार याची किंचित्‌शी चुणुक जाणवते. बल्लवाने ज्या रीतीने कीचकाला आवळला, तशा प्रकारचा पेच एखाद्या आचाऱ्यास अवगत असावा

**मारून मुटकून मान**




**शेवटी 'एकमताने' काँग्रेसचे अध्यक्ष निवडले**








याचे त्यास मोठे आश्चर्य वाटते. काही क्षण आखाड्यात दोघेही लोळतात नि एकमेकाला लोळवतात, परंतु सैरंध्रीला मात्र ते क्षण युगायुगासारखे दीर्घ वाटतात. प्रत्येक जण दुसऱ्याच्या पेचातून स्वतःची सुटका करून घेण्याची धडपड करीत आहे. कीचक देखील तशाच प्रकारच्या मिठीत बल्लवाला पकडण्याचा प्रयत्न करतो. परंतु त्या पेचाचे तपशील बल्लवाला सूक्ष्मपणे ज्ञात असल्याने तो कीचकाच्याच तंगड्या त्याच्या मानेत अशा रीतीने अडकवतो की कीचकाला आपले पाय किंवा हात सोडवून घेता येत नाहीत. त्याला गुदमरल्यासारखे होते, त्याच्या मानेची एक शीर तुटते नि तोंडातून रक्त वाहू लागते. राक्षसाप्रमाणे कीचकाच्या छातीवर बसून बल्लव दात ओठ खात त्याचे हात पिरगाळू लागतो. कीचक अजूनही सुटका करून घेण्यासाठी वळवळ करीत आहे. बल्लव त्याच्याकडे तिरस्कारयुक्त मुद्रेने परंतु उत्सुकतेने पहात आहे. कीचक जो जो आपले हातपाय सोडवण्याची धडपड करीत आहे तो तो बल्लव त्याचे हात अधिकच पिळून घट्ट करीत आहे. सरतेशेवटी कीचक थकतो नि आपले निरर्थक प्रयत्न सोडून देऊन आपले डोके किंचित् मागे टाकतो....त्याच्या डोळ्यातून अश्रु ओघळू लागतात, तोंडातून रक्त वाहू लागते, श्वास जड होतात नि तो कण्हू लागतो. ]

**बल्लवः** (मोठमोठ्याने हसत) कीचका, तू स्वतःला बलाढ्य, अजिंक्य म्हणवून घेतोस ना? . . . . मग आता काय म्हणणार आहेस? एखादा शब्दही उच्चारण्याची ताकद कदाचित् तुझ्यात आता उरली नसेल. भल्या माणसा! *न्याय्य* लढतीच्या गप्पा मारत होतास नाही! सांग—मी देतो ती लढत *न्याय्य* आहे की नाही? (त्याला गदागदा हालवून) ही पकड तुला माहित नव्हती असं म्हणू नकोस ! आपण कुस्तीगीर हिलाच 'मृत्यूची पकड' म्हणतो. मी तुझ्याकडे येतानाच तुला तिचा अंदाज बांधता आला हे मला ठाऊक आहे. तुला ती चुकवता यावी म्हणून मी भरपूर वेळ दिला होता, नि तूही सुटण्याचा बराच प्रयत्न केलास. मी जेव्हा तुझ्या उरावर बसलो तेव्हा तूं निसटण्याची बरीच धडपड करीत होतास आणि आता निराधार स्थितीत तूच आपण होऊन जमिनीवर निपचित पडला आहेस. मी तुला *न्याय्य* लढत देतो आहे का नाही ते आता तूच स्पष्टपणे सांग.

**कीचकः** (हलके हलके डोळे उघडतो—दुःखानं त्याचा चेहरा इतका काळवंडला आहे की *त्याला* शब्दोच्चार करणेही अवघड झाले आहे) . . . . तू तुझी मिठी थोडीशी . . . . सैल केल्याशिवाय मला बोलता. . येणार नाही...

**बल्लवः** (मोठ्या आनंदाने) आता कुठं तुझं डोकं थोडं थोडं जागेवर येऊ लागलं आहेस दिसत आहे...आता तू बोलू शकशील, परंतु रात्रभर जशी तुझी जीभ चुरचुरत होती, तसं कदाचित आता नाही बोलता येणार तुला. तरीसुद्धा तुला तुझी शेवटची इच्छा बोलून दाखवता यावी म्हणून मी माझी मिठी सैल करतो.. मला आणि हिला उद्या दरबारात येण्याची भाषा तू बोलत होतास नाही? . . पण मला वाटत आता सम्राट, त्यांचे सल्लागार आणि दरबारातील इतर मंडळी याना इथंच यावं लागेल नि त्यांच्या समक्ष तुझ प्रेत लांडगे नि गिधाड यांच्या स्वाधीन केलं जाईल... स्वतःला बलाढ्य नि अजिंक्य म्हणवून घेणाऱ्या कीचकाने एका स्त्रीवर—आपल्या दासीवर—हात टाकण्याचा कसा प्रयत्न केला नि अजिंक्य सामर्थ्याचा बुरखा पांघरणाऱ्या पौरुषहीन नरपशूंची काय दशा होते. . . . हे आता मी त्यांना सप्रमाण दाखवून देईन... अगदी खात्रीनं.....

**कीचकः** तोंड आवर! जेव्हा तू मला पकडीत धरलंस तेव्हाच तुझी चर्या साफ बदलली होती, पद्धती बदलली होती. तू नाटक करत असावास असं मी मघाशीच म्हणालो होतो. मी खचत चाललो आहे परंतु *न्याय्य* लढतीमुळं नव्हे तर मी गैरसावध असता तू हल्ला केलास म्हणून. . . मी, माझे गुरु आणि गुरुबंधु यांखेरीज या पकडीचं ज्ञान इतर कुणाला असेल असं मला या क्षणापर्यंत वाटलं नाही.. मी मृत्यूला भीत नाही, आजपर्यंत कधीच भ्यालोही नाही. परंतु एखाद्या यःकश्चित सूपकाराला ही मारणांतिक पकड माहीत असावी व त्यानं माझ्या मृत्यूसाठी तिचा उपयोग करावा—याचंच मला मरणापेक्षा अधिक दुःख होत आहे. खरं सांगायचं तर आयुष्यभर सतत मिळत गेलेल्या यशाला मी कंटाळलो होतो आणि म्हणूनच कोणीतरी मला अपयशाची, मृत्यूची चुणुक दाखवावी म्हणून मनातल्या मनात मी झुरत होतो. तुल्यबल अशा कुस्तीगीराशी दोन हात करता यावे म्हणून माझे हात शिवशिवत होते . . . पण आज शेवटी माझ्या नशिबी काय आलं! दैवानं खरोखरच माझ्यावर सूड उगवला.. जो कोणत्याही अर्थानं माझी केव्हाच बरोबरी करू शकणार नाही, जो माझा एक दास आहे.. नव्हे केवळ सूपकार—आचारी—स्वयंपाकी आहे, त्याच्याशी मला लढावं लागत आहे. . मला माहीत असलेल्या पकडीतच त्यानं मला धरलं असूनही मला माझी सुटका करून घेता येत नाही हे माझं सर्वांत मोठं दुर्दैव. नीच माणसांच्या पकडीत सापडून मरण पत्करणे मात्र माझ्या जीवावर येत आहे.

**बल्लवः** ज्याक्षणी मी तुला माझ्या पकडीत घट्ट आवळीन त्याच क्षणी तू मृत्यूला कवटाळशील अशी जर मला खात्री नसती तर तुझी हलकट भाषा ऐकण्यासाठी मी पकड सैल केलीच नसती... वस्तुस्थिती काय आहे हे तुला सांगू का? मी ज्या रीतीनं तुझ्याशी लढत आहे तीच *न्याय्य* पद्धत आहे. माझ्या पकडीच्या स्पर्शातच पुढं काय होणार याची तुला जाणीव उत्पन्न करून दिली आहे. तुझ्या डोळ्यात तरळणारं आश्चर्य माझ्या नजरेतून सुटलेलं नाही... या पकडीचा घातकी परिणाम तू ओळखला होतास हे मी जाणलं आहे. त्यामुळंच मजवर कोणताही दोष येऊ शकत नाही.. मला वाटतं मी तुझ्याशी बाजवीपेक्षा जास्तच *न्याय्य* वागलो.. तू मात्र *अन्याय्य* रीतीनं वागलास. . .

**कीचकः** *अन्याय्य*? मी.. अजिंक्य..कीचक..कधीच शक्य नाही...

**बल्लवः** (प्रत्येक शब्दावर जोर देत) होय—तू. . अन्याय्य वाग-









लास! आपण कोण आहोत हे तू ओळखलं नाहीस म्हणून प्रथम तू स्वतःशीच अन्याय्य वागलास. सामर्थ्य, अजिंक्यत्व नि पराक्रम यांच्या भ्रांत कल्पनानी तुझी स्मृति झाकाळली होती. तू तुझ्या गर्वाच्या ताठ्यात मिरवत असल्यानं ज्या गुरूंनी तुला ही पकड शिकवली नि जी तू या क्षणापर्यंत स्मरत होतास ती पकड आणि ते गुरु यांचं तुला विस्मरण झालं नि म्हणूनच तुला विद्येचा उपयोग करता आला नाही.

**कीचकः** तू म्हणतोस ते कदाचित् खरंही असेल! परंतु जी पकड केवळ माझे गुरु आणि गुरुबंधु आजपर्यंत जाणत आलेत तिचाच उपयोग माझ्यावर तुझ्यासारख्या एखाद्या क्षुद्र माणसाकडून होईल अशी मी कल्पना तरी कशी करावी?..ते सारे उच्च कुलोत्पन्न होते.. कुलपुत्र होते....

**बल्लव** (निश्चयाने गंभीरपणे) जो कोणी स्वतःला निश्चितपणे जाणतो नि त्याहून स्वतःच्या गुरुशी जो सदैव प्रामाणिक नि कृतज्ञ असतो त्याला मिळवलेल्या विद्येचा योग्य उपयोग—मला आता झाला तसा—होतोच होतो, मग त्याचा सामाजिक दर्जा कोणताही असो..शिक्षणाचा नि सामाजिक दर्जाचा काहीही संबंध नाही. —हे नीट लक्षात ठेव......

**कीचकः** (हसण्याचा प्रयत्न करीत) तुझ्याही गुरूंनी तुला ही पकड शिकवली होती? मला हंसण्याचेही कष्ट आता सहन होत नाही परंतु खरं सांग—माझे गुरु श्री बलराम प्रभु—साक्षात् वृष्णीपुंगव भगवान् श्रीकृष्णाचे बंधु—यांच्याइतके तुझे गुरु श्रेष्ठ आहेत?

**बल्लवः** ते काही मला माहीत नाही...आणि तेच माझेही गुरु आहेत.....

**कीचकः** (आश्चर्याने) काय म्हणतोस?

**बल्लवः** होय!

**कीचकः** तू त्यांच्याच पासून ही विद्या शिकलास? केव्हा?

**बल्लवः** तू शिकत होतास तेव्हाच.....

**कीचकः** (अविश्वासाने) माझी थट्टा करतोस काय? आम्ही शिकत असताना आमच्या बरोबर तुला कधी पाहिल्याचं आठवत नाही मला. नि शिवाय आमचे गुरु, आम्हा पाच शिष्यांखेरीज कुणाही अकुलीनाला शिकवत नसत......

**बल्लवः** माझ्या अकुलिनत्वाला फारसं महत्त्व देऊ नकोस! तुम्ही पांच जण होता तरी कोण?

**कीचकः** मी, सुयोधन सात्यकी, जरासंध आणि वृकोदर... आमच्या बरोबर तुला....

**बल्लवः** तुला आठवत नाही म्हणूनच आश्चर्य वाटत आहे...जन्म, कुळ, वंश, प्रतिष्ठा याविषयीच्या भ्रांत कल्पना नि या राज्याला,

या तुझ्या मत्स्यभूमीला आणि कुलाला माहीत नसलेला तुझा हा उन्मत्तपणा यामुळं तुझी स्मरणशक्ती झाकाळून गेली आहे.

**कीचकः** पण तू आचारी आहेस. . . केवळ एक दास आहेस. . होय ना?

**बल्लवः** आज मी स्वतःला आचारी म्हणूवन घेत आहे हे खरं आहे, पण कदाचित उद्या सुयोधनानंतर मीच या आर्यावर्ताचा सम्राटही होईन, काय सांगावं. . .?

**कीचकः** स्वतःची तुलना त्या श्रेष्ठ सुयोधनावरोबर करण्याच्या



तुझ्या उद्धटपणाचं मला हंसू येतं. . . तू काहीही म्हण. . तू दिसतोस तसा आचारी किंवा यःकश्चित् दास नाहीस. . (मोठ्या कष्टाने) माझ्यासारख्या अजिंक्य वीराला—एखाद्या आचाऱ्या-कडून मग तो राजगृहातला असला म्हणून काय झालं—मरण यावं याहून अधिक लांछनास्पद ते काय असू शकेल?

**बल्लवः** भल्या माणसा! कुल आणि रक्त याहीपेक्षा माणसाच्या चारित्र्याचं मोल अधिक असतं. . . तसा विचार केला तर आपण सारीच त्या जगन्नियत्या परमेश्वराचीच लेकरं आहोत... सारी एकाच दर्जाची. . . एकाच रक्ताची. . .

**कीचकः** पंचवीस वर्षापूर्वीची घटना. . . एका स्त्रीनं पाच पतीना वरलं. . ते खऱ्या अर्थानं ईश्वराचे पुत्र होते. . . परंतु एखाद्या आचार्यानंही आपण ईश्वराचे, चिरंजीव आहोत असं म्हणणं—मला कल्पनेतही सहन होऊ शकत नाही? तू काय स्वतःला पांडव समजतोस?

**बल्लवः** होय!

**कीचकः** मग तू इतका वेळ खोटं कां बोललास? मला सुखाचं—समाधानाचं मरण लाभावं म्हणून माझी समजूत करण्याकरता सुद्धा आपण पांडवाच्या वंशाचे आहोत—रक्ताचे आहोत असे सांगण्याचा उद्दामपणा कां करतोस?

**बल्लवः** मी आता खोटं बोललो नाही..कारण मी कधीच खोटं बोलत नाही.

**कीचकः** परंतु मला जो तू दिसत आहेस तो तू एक सूपकार, आचारी, दास—आहेस.

**बल्लवः** माझ्या सध्याच्या व्यवसायावरून तसं वाटत असेल! परंतु तू मला पूर्वी पाहिलं आहेस, नि तरीही जर तुला आठवत नसेल तर तू तुझ्या स्मरणशक्तीला दोष दे. पूर्वीचे दिवस आठव.. आठव....तुझे गुरु आणि त्यांचा तो शिष्यवृंद—नीट आठव. . नि मग तुला मी तुझा प्रतिस्पर्धी होतो हे सहज लक्षात येईल. . . माझ्या सारख्याच्या हातून मृत्यु आला तर मग तुला वाईट वाटण्याचं काहीच कारण उरणार नाही. . . . वाटला तर अभिमानच वाटेल....

**कीचकः** थोडा थांब! क्षणभर मला विचार करू दे! समवयस्क व तुल्यबल प्रतिस्पर्ध्याच्या हातून अपयश नि मृत्यु यावा म्हणून आज कित्येक दिवस कीचक तळमळत आहे...तू म्हणतोस ते जर खरं असेल तर मला विलक्षण आनंद होईल. . . तू कोण आहेस याचा विचार करण्यास तू मला आणखी किती काळ जीवदान देतोस?

**बल्लवः** मरताना तरी तुला समाधान लाभावं, योग्य नि तुल्यबल प्रतिस्पर्ध्याच्याच हस्ते आपला मृत्यु घडून येत आहे अशी तुझी खात्री व्हावी, एवढ्याच करिता मी तुझी मिठी आणखी थोडी सैल करून तुझं आयुर्मान वाढवत आहे. (मिठी थोडी सैल करतो).. कर तुला काय प्रयत्न करायचा आहे तो. .

( पूर्वीचे दिवस आठवावे म्हणून कीचकाकडे एक अर्थपूर्ण नजर टाकून डोळे मिटतो.)

**सैरंध्री**: (बल्लवास हलक्या आवाजात) परंतु. . .तू कोण आहेस हे जर ह्यानं ओळखलं तर मग सारा कारभारच आटोपला... परिणामाची कल्पना आहे ना तुला? आपले प्रिय प्राण वाच-विण्यासाठी स्वत:ची ओळख पटू न देण्याची शर्थ करीत असता इतके दिवस घालवल्यानंतर आता अगदी मुदत संपत आली असताना. . . . . .

**बल्लव**: सुंदरी तू त्याची बिलकूल काळजी करू नकोस. मी कोण आहे हे ह्याला ज्या क्षणी कळेल त्याच क्षणी तो मृत होऊन पडेल. कळलं तर सुखानं मरेल बिचारा. . . .मरणोन्मुख माणसाशी अयोग्य रीतीनं वागणं बरं नाही! . .शिवाय इथंही जवळपास दुसरं कोणीच नाही. त्यामुळं याच्या तोंडून सत्य जरी बाहेर पडलं तरी ते तुझ्या माझ्याशिवाय ऐकणार कोण? . . . .भिण्याचं काही कारण नाही. . . . . .

**कीचक**: (सावकाश डोळे उघडून आढ्याकडे नजर लावून अगदी हलक्या आवाजात ) तुम्ही दोघंही वेषांतर करून इथं वावरत असावा असं वाटतं. . . .पण असं कां?

**बल्लव**: पुरतेपणी आठवलं म्हणजे तुला माझ्या खऱ्या स्वरूपाची ओळख पटेल. . . .कर प्रयत्न.

**कीचक**: मी शपथ घेऊन सांगतो, मला तुझी ओळख पटत नाही..

**बल्लव**: प्रयत्न केलास तर तुला सहज पटेल. . .

**कीचक**: माझ्याकडून मी प्रयत्नांची पराकाष्ठा करीत आहे. . माझे गुरु, आणि त्यांचे आम्ही पाच शिष्य याखेरीज इतर कुणालाही ही पकड माहीत असेल या गोष्टीवर माझा विश्वासच बसू शकत नाही.....

**बल्लव**: पण माझा बसू शकतो!

**कीचक**: तू सुद्धा माझ्याच गुरूंचा शिष्य आहेस, असं तू अजूनहि म्हणतोस?

**बल्लव**: होय.

**कीचक**: मग तू आहेस तरी कोण? ज्याला ही पकड माहीत आहे असा माझा एक समवयस्क गुरुबंधु म्हणजे –सुयोधन....

**बल्लव**: आणखी?

**कीचक**: सात्यकीलाही ही ठाऊक होती.

**बल्लव**: आणखी कोण?

**कीचक**: एक. . . .ज रा सं ध. . . .

**बल्लव**: (त्याला आठवण्यास मदत व्हावी या उद्देशाने) आणखी कोणी?

**कीचक**: भी म से न!

**बल्लव**: हो. .य. . .

**कीचक**: आणि शेवटी पाचवा उरलो तो मी स्वत:च. .दुसरं कुणीच नाही.. माझी खात्री आहे.

**बल्लव**: समज, मी ह्याच पाच जणांपैकी एक आहे. . .मग तुझं काय म्हणणं आहे?

**कीचक**: (मोठ्याने ओरडून) मग तू खोटं बोलत आहेस, असं माझं म्हणणं आहे.

**बल्लव**: (संतापाने) थोड्याच वेळात तू मरणार आहेस हे मला जर माहीत नसतं तर तुझी ही जीभ हसडूनच बाहेर काढली असती. . (थोडे शांतपणाने) असं पहा, तुझ्याशी खोटं बोलायचं मला कारणच काय? उलटपक्षी तूच खोटारडा आहेस, मी वेळ दिला असूनहि तुला आठवत नाही, तेव्हा तू स्वत:शीच प्रतारणा करतो आहेस. . .तुझ्या गुरूंच्या ज्या पाच शिष्यांना तू श्रेष्ठ समजतोस त्यांपैकीच मी एक आहे अशी तुझी खात्री पटवून देणं मला फारसं अवघड नाही. . .मग तरी सुखानं मरशील का?

**कीचक**: तू अशी उडवाउडवी कां करतोस? आपण स्वत:च कोण आहे हे चटकन सांगून मनाच्या या अनिश्चिततेतून माझी सोडवणूक कां करीत नाहीस?

**बल्लव**: याचं कारण इतकंच की, काही ठराविक काळपर्यंत आपण कोण आहोत याचा या पृथ्वीतलावरील कोणाही व्यक्तीला थांगपत्तासुद्धा लागू द्यावयाचा नाही अशा आम्ही दोघांनी शपथा घेतल्या आहेत.

**कीचक**: दोघांनी? म्हणजे कोणी?

**बल्लव**: (सैरंध्रीकडे बोट दाखवून) हिनी आणि मी. . . .

**कीचक**: या सांगण्याचा मला काहीच फायदा नाही. मी मघा-पासूनच म्हणतो आहे की तुम्ही दोघेही वेषांतरीत आहात. . .

**बल्लव**: तुझ्या जर पूर्वस्मृति जागृत होत नसतील तर मग माझाही नाइलाज आहे.

**कीचक**: मग तू आहेस तरी कोण? . . . .एकदाच सांगून टाक ना! मला मोकळं कर!

**बल्लव**: तुला चांगलाच परिचित असलेला कोणी एक. .जे बल-राम तुझे गुरु तेच माझेही गुरु, नि मी त्यांचाच एक शिष्य....

**कीचक**: (किंचित् नमते घेऊन) तू कदाचित् त्यांचा शिष्य अस-शीलही...परंतु आम्हा पाच जणांबरोबर तरी तू खास नव्हतासच, कारण त्या साऱ्यांना मी नीट ओळखतो.

**बल्लव**: मी सुद्धा तेच म्हणतो आहे की तू मलाही ओळखतोस म्हणून. आणखी एकदा–अगदी शेवटचंच–पुन्हा आठवून पहा.... म्हणजे तुला सारा उलगडा होईल......

**कीचक**: थांब, पाहतो शेवटचा प्रयत्न करून. माझ्या सहाध्यायांची एकामागून एक उजळणी करून पाहतो... सुयोधन? . . . .छे: शक्यच नाही.. तो तर सध्या हस्तिनापूरला असून हद्दपार केलेले पांडव परत कधी येतील नि राज्य मागतील म्हणून अनिमिष नेत्राने बसला असेल.....

**बल्लव**: आणखी दुसरा. . . . .

**कीचक**: जरासंध! परंतु भीमानं त्याची चिरफाड केल्यानं तो तर केव्हाच मेला. . . .

**बल्लव**: तिसरा. . .

**कीचक**: सात्यकी... परंतु तू तर त्याच्याहून फारच वेगळा दिस-तोस. तो जरी कोणत्याही वेषात आढळला तरी मी त्यास निश्चित ओळखू शकेन....

**बल्लव**: मग आता राहलं कोण?

**कीचक**: मी स्वत:... मी तरी काही तुझ्या वेषात खास नाहीच... तू काही जिवंत असलेला सुयोधन नाहीस, किंवा मेलेला जरासंधही नाहीस... वेषांतरीत सात्यकी नाहीस किंवा कीचक तर नाहीच नाही... अरे मी पाचवा... विसरलोच की.. नि तो म्हणजे (बल्लवा-कडे निरखून पहात एकदम).. तोच तू. . . . .

**बल्लव**: होय. . . .मीच तो. . .तोच मी. . .तो मीच. . .

**कीचक**: (हे ऐकून कीचक धपकन् मागे पडतो नि त्याच्या डोळ्या-तून अश्रु वाहू लागतात). अरे भीमसेना! इतका वेळ हे तू मला कां सांगितलं नाहीस? पहिल्या भेटीतच तू हे मला सांगायला हवं होतंस रे! . . . .तू. . . . . .

**बल्लव**: मी तुला सांगितलं नाही का, तूर्त आम्ही वेषांतरीत आहोत, नि आमचं खरं स्वरुप कुणालाही कळू द्यायचं नाही अशी आम्ही शपथ घेतली आहे.

**[क्रमश:]**








**गांधर्व महाविद्यालयाची लाहोर येथील शाखा स्थापन करणारे व फाळणीमुळे आपल्याच हातानी पण लकाकत्या हृदयाने ती बंद करून उर्वरित आयुष्य कलकत्ता येथे वेचलेले मागील पिढीतील एक थोर कलावंत व गायक कै. पं. ज. वि. पेठे यांच्या आठवणींची ही झलक या अंकापासून पूर्णविराम पावत आहे. कै. पेठे यांनी लिहून ठेवलेल्या त्या 'आठवणी' अगत्याने दिल्याबद्दल त्यांचे चिरंजीव व कलकत्ता येथील एक पत्रकार श्री. वि. ज. पेठे यांचे आभार मानावे तेवढे थोडेच.**






## कै. पं. ज. वि. पेठे

# तपश्चर्या फळास आली

साधारणपणे १९२४–२५ ची गोष्ट असेल. तेव्हा मी गांधर्व महाविद्यालयाचे बोर्डिंगमधे राहून संगीताचे शिक्षण घेत होतो. त्यावेळी तेथे लहान मोठे मिळून १५०–२०० विद्यार्थी होते. आमचीच टोळी वयाने सर्वात लहान. मी असेन १४–१५ वर्षांचा.

आमचे शिक्षण ठराविक पद्धतीने इतर मुलांसह होत असे. संगीत म्हणजे काय याची मला अगोदर काहीच माहिती नसल्याने क्लास-मधे जाणे, व कोणी जे शिकवील ते शिकणे यापलिकडे काहीही कळेल तर शपथ. काहीच समजत नव्हते. त्यामुळे म्हणण्यासारखी विशेष प्रगती नव्हतीच. नेमक्या त्याच वयात आवाज फुटून त्याचे मडके झालेले. मग गाणार काय डोंबल ? मी पण शक्यतोवर गाणे म्हण-ण्याचा चुकारपणा करत असे. त्यामुळे फुटलेल्या आवाजावर मेहनत पण होत नसे.

त्या परिस्थितीत एका सुट्टीच्या निमित्ताने मी रत्नागिरीस आईवडिलाना भेटण्यासाठी गेलो होतो. तेथे नातेवाईक मंडळी मला गाण्याचा सारखा आग्रह करीत, आणि मी तो टाळण्याचा जास्तीत जास्त प्रयत्न करीत असे. परंतु कुठें ना कुठे तरी गाणे म्हणा-वेच लागे. अशा वेळी गाणे म्हटले की लोक म्हणत, "काय रे, आवाजाचे तर मडके झाले. असंच का गाणं म्हणणार तू ?"

मला वाईट वाटे. आवाज फुटला यात माझा काय दोष ? फुटलेला आवाज ठीक होण्यासाठी कमीत कमी तीन चार वर्षांचा तरी काला-वधी लागतो, हे सर्वसामान्य लोकाना माहीतही नसते. त्यांचे मते माझा आवाज तसाच राहणार व माझे गाणे बोंबलणार ! तीच समजूत माझ्या बहुतेक नातेवाईकांची !! त्यात प्रमुख म्हणजे माझे धाकटे मामा श्री. रामभाऊ. पण त्याना गाण्याचा मात्र अतिशय नाद. मला सारखे म्हणण्याचा आग्रह त्यांचाच असे. परंतु आवाज फुटलेला पाहून त्यानी तात्यांच्या (वडिलांच्या) मागे लकडा लावला की जनूला गांधर्व संगीत शाळेतून काढून पुन्हा येथे हायस्कूलमधे, नाहीतर वैदिक शाळेत घालून संस्कृत शिकवा. आमची परिस्थितीच त्यावेळी अशी होती, की आम्हाला जोराने बोलणे किंवा करणेच शक्य नसे. उलट सदा दुसऱ्यापुढेच नमते घ्यावे लागत असे. मामाच्या सांगण्यामुळे रत्नागिरीच्या संस्कृत पाठशाळेत घालण्याचे ठरविले. इंग्रजी घरीच करवून घेईन असे मामाने तात्याना सांगून टाकले. पण माझ्या मनाला त्या दोन्ही गोष्टी पटत नव्हत्या. माझे मन सांगे, जेथे तू चार-पाच वर्षे शिकलास तेथेच आणखी तीन चार वर्षे काढलीस तर एका मार्गावर तरी अग्रेसर होशील. पण आता सुरवातीपासून

रामः रामौ रामाः घोकीत बसून जाडा विद्वान केव्हा होणार ? मलाच ती गोष्ट पसंत नव्हती. मग. . .?

मी विचार करून एक पत्र गुपचुपपणे कोणालाही न सांगता पूजनीय गुरुजींच्या नावे लिहून त्यांना ती परिस्थिती कळविली. तसेच संस्थेत राहूनच गाणे शिकायचाच माझा इरादा आहे. तरी कृपा करून परभारे वडिलांना पत्र पाठवावे आणि मला संस्थेत तोवडतोब पोहोचविण्याची व्यवस्था करण्याबद्दल लिहावे, असे त्यांना विनविले. त्याचा इष्ट तो परिणाम झाला. गुरुजींचे पत्र तात्यांच्या हाती पडताच त्यांना पंचाईत पडली. नऊ वर्षांच्या कराराचा मी उल्लेख करताच त्यांचे मन पण डावलले. व तीन चार दिवसातच बोटीने मुंबई व तेथून नाशकास येऊन मी गुरुजींच्या चरणी रुजू झालो. मात्र येताना कोणाच नातेवाईकाला भेटलो नाही. मग मात्र रत्नागिरीला पुन्हा गेलो ते चार वर्षांनीच, आवाज सुधारून—चांगला सुधारून—गाणे चांगले म्हणता येईल अशी खात्री झाल्यावरच गेलो. नंतर माझी तेथे जी गाणी झाली, त्यांचे गुणानुवादच गाईले गेले. जर त्यावेळी मी रत्नागिरीलाच अडकलो असतो तर आयुष्याची नौका कुठे कशी भटकली असती, याची कल्पनाच करवत नाही.

## कौलाला पाडलेला तडा

सन १९२२ चे सुमारास गुरुजींचा मुक्काम मुंबईच्या सँढर्स्ट रोडवरील स्वतःच्या मालकीच्या गांधर्व महाविद्यालयाचे भवनात होता. गुरुजींची खोली चौथ्या मजल्यावर होती. तेथे ते सतत गायनाची साधना करीत असावयाचे व आवाजाला निरनिराळ्या तऱ्हेने वळण देण्याचे त्यांचे यत्न सुरू असावयाचे. त्यांच्या आवाजाची खुबीच अशी होती की, एकीकडे मेघांचा गडगडाट जितक्या जोराने व्हावा, तर दुसरीकडे तितक्याच एकदम कोमल व हृदयाला सुखावणाऱ्या स्वरलहरी कानावर याव्यात.

असा अभ्यास करीत असतानाच आवाजाला उंच चढवून, त्याचा धक्का कसा कोठे बसतो, ते पहाणे गुरुजींनी सुरू केले. त्या खोलीवर मंगलोरी कौले होती. त्यातच दोन तीन कांचेचीही कौले होती. त्या काचेच्या कौलावर ते आपल्या आवाजाची धडक मारू लागले. असा प्रयत्न काही दिवस केल्यानंतर खरोखरच एके दिवशी आवाजाच्या धडकेने त्या काचेच्या कौलास तडा गेल्याचे प्रत्यक्ष दिसताच, गुरुजीना जो आनंद झाला तो मात्र वर्णन करणे कठीणच. जणू तपस्येचे फळच मूर्त रूपाने दिसू लागले. लगेच त्यांनी आपले पट्टशिष्य श्री. नारायणराव व्यास, श्री. ठकार, श्री. अष्टेकर आदि शिष्यांना बोलावून ते तडा गेलेले कौलही दाखविले.

## बुवांचा गुरुवार....!

आमचे मोठे गुरुबंधू पं. विनायकबुवा पटवर्धन हे एकदा लाहोरला माझ्याकडे पाहुणे म्हणून आले. त्यावेळीच पं. नारायणराव व्यासही माझ्याकडे पाहुणचारासाठी आलेले होते. दोघेही माझे गुरुबंधू असल्याने त्यांना पाहुणे म्हणणे गैरच. घरच समजून ते माझ्याकडे रहात असत. बुवांचा गुरुवारचा उपवास म्हणून त्यांच्या मुक्कामातील गुरुवारी त्यांचेसाठी फराळाचे पदार्थ तयार केले. आम्हा सर्वांसाठी मसाले भात, भजी, पापड व पोळ्या असा स्वयंपाक सौ. मनोरमेने केला. आम्ही जेवावयास बसलो. बुवाना स्वतंत्र टेबलावर फराळाचे ताट सादर केले.

गप्पा मारीत आमचे जेवण व पटवर्धनांचा फराळ सुरू झाला. साबुदाण्याची खिचडी, रसगुल्ले, केळी व दूध हा फराळ बुवांनी केव्हाच उडविला. आमचे जेवण मात्र आग्रहाने चाललेच होते. नारायणराव भजांचे मोठे चाहते. म्हणून भजीही होतीच. फराळ आटोपल्यावर बुवांच्या नाकात भजांचा खमंग वास शिरला. पापडाचा घमघमाटही त्याना चैन पडू देईना. मधूनच मसालेभाताचा वास गदगुल्या करू लागला. अशा रीतीने बुवांवर चौफेर 'हल्ला' सुरू झाला. बुवा चारीमुंड्या चीत. जिभेवरचा ताबा सुटला. गुरुवारला पापड चालतो, असे सांगून त्यांनी पापड खाल्ला. झाले. मी सौ. ला सांगितले, 'जरा बटाट्याची चार भजी वाढ त्यांना' बुरुज ढासळला. असे करता करता सौ. मनोरमेने एक ताटच आणून बुवांपुढे ठेवले व म्हणाली, 'बुवा आजचा दिवस उपास राहूद्या. प्रवासातच आहात. तरी चालेल एकादा नागा (खाडा).' आम्हीही जोर दिला. मग काय विचारता ? बुवानी पहिल्यापासून हात मारून उपासाचे पारणे फेडले. तो प्रसंग अजूनही आठवून हसता हसता मुरकुंडी वळली.

## हा आणखी एक किस्सा

एका सुट्टीत मी लाहोरहून मुंबईला आलो होतो. त्यावेळी माझे मेव्हणे श्री. नारायणराव आपटे गंगाराम खऱ्यांच्या चाळीत रहात असत. त्यांचेकडेच मुक्काम ठोकला. कर्मधर्मसंयोगाने मी तेथे पोहोचलो त्याच्या आदल्याच दिवशी माझी आतेबहीण सौ. अक्का ही माहेरपणासाठी रत्नागिरीला रवाना झाली होती. त्यामुळे घरात मेव्हणे श्री. नानासाहेब एकटेच होते. मी घरी पोहोचलो तेव्हा त्यांची आंघोळ आटोपली होती. आणि ते उद्योगधंद्याला जाण्याच्या गडबडीत होते. ते म्हणाले, "आंघोळ वगैरे आटोपली की तुम्ही समोरच्या भागवतांच्या खाणावळीत जेऊन घ्या. मी त्यांना सांगून ठेवतो . . . कारण सौ. अक्का कालच रत्नागिरीला गेली आहे." एवढे सांगून ते भागवतांकडे जेवले व ऑफिसला गेले.

अकराचे सुमारास सर्व काही आटोपून मी खाणावळीत गेलो. गाडीच्या दोन दिवसांचे प्रवासात जेवणखाण नीटसे झाले नव्हते. त्यामुळे रान चांगलेच कडाडले होते. ताट वाढून येता येताच मराठी अन्नाचा वास दरवळला. बऱ्याच दिवसांनी आपले अन्न मिळणार होते. कारण त्यावेळी मी लाहोरला एकटाच होतो. स्वयंपाकासाठी एक गढवाली नोकर होता. तो डाळ, फुलके, भाजी बनवावयाचा, परंतु उत्तर हिंदुस्तानी पद्धतीने. त्यामुळे कळत न कळत त्या जेवणाची सवय लागली होती. अधूनमधून केव्हातरी एखाद्या परिचित महाराष्ट्रीय मित्राकडे जेवावयास गेले, की तेवढेच काय ते मराठी जेवण








पोटात पडे. त्या प्रकारामुळे समोरच्या सुग्रास अन्नाचा आनंद काही न्याराच वाटला.

जेवावयाला प्रारंभ केला. भाजी आमटीचीही चव चांगली लागली. पहिला भात संपला. वाढप्याने एक पोळी पानात टाकली. ती मी केव्हाच फस्त केली. तेव्हा त्याने विचारले, पोळी की भात ? मी म्हणालो, पोळीच. असे त्याने दोन तीन वेळा विचारले. तेव्हा मी त्याला म्हटले, भटजी, मी भात मागेपर्यंत पोळयाच वाढत चला. मला भातापेक्षा पोळ्यांचीच आवड जास्त, आणि संवयही तीच होती. मुंबईचे ते लहान लहान फुलके. आठ दहा फुलक्यांचा फडशा केव्हाच उडाला. तरी मी पुन्हा पोळी मागितली. तेव्हा आतील स्वयंपाकी एकदा दारातून डोकावून गेला. कोण नवखा आला आहे ते पहाण्यासाठी ! मला जरा हसू आले.

बारा फुलके झाल्यानंतर मी भाताची मागणी केली. तेव्हा भटजी बोलते झाले, आपण मुंबईबाहेरचे दिसता. तेव्हा मी म्हणालो, 'होय. मी पंजाबमध्ये रहातो.'

'तरीच.' नाहीतर इकडे मुंबईच्या लोकांचा आहार म्हणजे मागचा पुढचा भात व एक पोळी, बस.'

सायंकाळी नाना आले, रात्री आम्ही दोघे जेवावयास गेलो. तेव्हा, भागवत म्हणाले, 'पाहुणे किती दिवस रहाणार आहेत ?'

मी सहजच चेष्टेने म्हणालो, 'काहो भटजी, उद्या जेवावयास घालणार कीं दुसरीकडे व्यवस्था करावी लागेल ? त्याबरोबर तेथील सर्वच लोकाना हंसू आले.

## वडिलांचे भेटीसाठी बर्फाच्या मोटारीतून झालेला प्रवास

एप्रिल १९४१... माझे वडील ति. तात्या रत्नागिरी येथे संग्रहणीच्या विकाराने कित्येक महिन्यापासून आजारी होते. दिवसें-दिवस आजार बळावतच चालला होता. म्हणून त्याना भेटण्यासाठी लाहोरहून मुंबईला आलो. आणि रत्नागिरीच्या मोटारीची काय सोय, या विचारात पडलो. तेव्हा कांदेवाडीतील एका गृहस्थानी असे सांगितले की एक खाजगी गाडी दुसरे दिवशी चिपळूणपर्यंत जाणार आहे. तिने चिपळूणपर्यंत जा, आणि तेथून रत्नागिरीची मोटार पकडा. तुम्ही चिपळूणला दुपारी तीनला जाल आणि पुढे मोटार मिळू शकेल. मी त्याप्रमाणे सर्व व्यवस्था केली नि निघालो. त्यावेळी चिपळूणपर्यंत फक्त पाच रुपये तिकीट होते.

पहाटे पाच वाजता मोटारीच्या अड्डयावर पोहोचलो. तेथे आणखी तीन चार प्रवासी होते. बाकी सर्व जागा बर्फाच्या लाद्यांनी भरली होती. बर्फ घेऊन संगमेश्वरच्या अलीकडील एका दर्ग्याच्या उरुसानिमित्त ती स्पेशल मोटार निघाली होती. मोटारीत बर्फच असल्याने गाडी थंड होती. दुपारी दोनला आम्ही खेडला आलो. तेथून एक बस थेट रत्नागिरीला जाणारी होती. तीमधे माझी सोय आमच्या मोटारवाल्याने करून दिली. लवकरात लवकर घरी पोहोचणे जरुरी असल्याने तावडतोब मोटार मिळाल्याबद्दल मला आनंदच झाला. पण चिपळूणला पोहोचताच गाडी बिघडली. तेथे तास दीड तास फुकट गेला. सायंकाळी ६-६॥ चे सुमारास तेथून पुढे निघून रात्री आठला संगमेश्वर गाठले. तेथे ड्रायव्हर म्हणू लागला, आता रात्रीचे पुढे जाणे कठीण आहे. मग मी त्याच्यावर उखडलो. मी म्हटले, "मला आज रत्नागिरीस पोहोचलेच पाहिजे. माझे वडील आजारी आहेत म्हणून तर एवढी घाई. तू पोहोचविण्याचे कबूल केलेस म्हणून मी बसलो तुझ्या गाडीत. तू मला रत्नागिरीस रात्रीच नेले पाहिजेस." त्याने कुरकुरतच गाडी सोडली. वाटेत पेट्रोल संपले म्हणून रॉकेल घातले. आणि रात्री अकरा वाजता एकदाचे आम्ही रत्नागिरीस पोहोचलो. वीज नसल्याने सगळे कसे भयाण वाटत होते. ति. तात्यांना भेटलो व जेवणखाण करून झोपलो.

माझा तेथे पंधरावीस दिवस मुक्काम होता. डॉ. जोगळेकर यांचे औषध सुरू होते. वडील बंधू शंकरदादा हे वडिलांची सेवा मनो-भावाने करीत होते. पण प्रकृतीस उतार नव्हता. अमावास्येला तर भीतीच वाटली की, रात्र तरी पार पडते किंवा नाही ? म्हणून बडे मास्तर व इतर दोन तीन मंडळी झोपण्यासाठीहि आली होती. पण देवाचे कृपेने ती रात्र टळली. आणि पुन्हा प्रकृति जराशी ताळयावर आली.

डॉ. जोगळेकरांनी मला काही दिवसानी सांगितले, तुम्ही किती दिवस राहाणार ? भेट झाली हे उत्तम. प्रकृतीचे काहीच सांगता येत नाही. निघाले तर सहा महिनेही निघतील. नाहीतर सहा दिवसांचाही भरवंसा नाही. तेव्हा तुम्ही कामाला लागणेच योग्य. मी थोडा विचार केल्यावर त्यांचे सांगणे पटले. लाहोरला रेडिओवर माझा कार्यक्रम ठरला होता. तो दिवसही जवळ येऊ लागला. शेवटी मन घट्ट करून निघालो. मुंबईला दोन तीन दिवस राहून लाहोर गाठले.

दुसऱ्याच दिवशी सकाळी रेडिओचे दोन कार्यक्रम झाले. घरी परतलो. जेवण करून विश्रांती घेत होतो, तेव्हा पोस्टमन आला. पत्र पाहतो तो ते दादाचे (मोठे बंधू शंकरराव यांचे) चैत्र शु. ११ ला ति. तात्यांना स्वर्गवास घडल्याचे वृत्त होते. (त्या दिवशी मी प्रवासातच होतो.) सर्वांना स्वाभाविकच दुःख झाले पण देवाजीची मर्जी ! त्याच सायंकाळी रेडियोवर पुन्हा दोन कार्यक्रम. ते मी तशा मनःस्थितीत कसे पार पाडले, हे आठवले की अजूनही आश्चर्य वाटते. त्यातील 'तुम बिन मोरी कोन खबर ले' हे रात्री गायलेले भजन फारच उत्तम झाल्याचे मित्रांनी सांगितले. पण ते गाताना मी कोणत्या भावनेत होतो हे त्या विचाऱ्याना काय माहीत ? नाहीतर ---वडिलांच्या निधनाचे दुःख उरी सलत ठेऊनही गाणे उमटेल का? पण मी मात्र गायलो खरा.

•••












> **दीपावलीकडे अभिप्रायार्थ पुस्तके पाठविताना नेहमी २ प्रति पाठवाव्यात. म्हणजे निश्चित अभिप्राय देणे सोईचे होते. १ प्रत असल्यास नुसती पोच दिली जाते.**
>
> **—संपादक**

### हे तो प्रचितीचे बोलणे

## जीवनाचे चित्तस्पर्शी दर्शन घडविणारे पुस्तक

**सौ.** मुक्ताबाई दिक्षित या मराठीच्या एक जुन्या लेखिका पण लेखनात अजून राहिलेल्या. मराठी साहित्याचा सातत्याने कानोसा घेणाऱ्या चोखंदळ आणि चिकित्सक वाचकांस त्यानी निर्मिलेल्या साहित्याची चांगली आणि नीट कल्पना व वूज आहे. तीन दशकावर मोजके पण लक्षवेधी लिहिणाऱ्या या लेखिकेचे साहित्य संख्येनं विपुल नसले तरी गुणाने संपन्न असल्याचाच निर्वाळा कुणीहि रसिक देईल. त्यानी सुरवातीला लिहिलेल्या हृदयस्पर्शी कथांचा प्रभाव असा की, कै. वा. म. जोशींसारख्या मर्मग्राही आणि निःपक्षपाती समीक्षकासहि त्याची दखल घ्यावी लागली. त्यांच्या '**जुगार**' या समस्याप्रधान व विचारप्रवर्तक नाटकाने पाहता पाहता मराठी नाट्य साहित्यात मानाचे स्थान पटकावले. आपल्या विचाराने, शैलीने आणि मौलिकतेने स्वतःची अशी एक वैशिष्टपूर्ण व अतुल भूमिका ज्या थोड्या साहित्यकारानी सिद्ध केली आहे त्यात सौ. मुक्ताबाईची निर्विवाद गणना आहे. त्यांचे नुकतेच प्रकाशित झालेले '**हे तो प्रचितीचे बोलणे**' हे मुक्तचिंतनाचे लालित्याने नटलेले निबंधवजा पुस्तक त्यांच्या भूमिकेची परंपरा यथार्थ व सार्थ करणारेच ठरेल.

सौ. मुक्ताबाईंची जीवनाकडे पाहण्याची वृत्ती आणि दृष्टी स्थिर झालेली नाही. वास्तविक त्या ज्या काळात वाढल्या आणि जेव्हा त्यानी साहित्याची आवड जोपासली तो काळ सौंदर्यवाद (Romanticism) आणि नीतिवाद (Puritanism) आणि राष्ट्रवाद (Nationalism) या त्रिपूटींच्या अलग अलग, संयुक्त किंवा संघर्षमय प्रभावाचा आणि परिणामाचा होता. सौ. मुक्ताबाईंच्या व्यक्तित्वावर या तिन्हीचे जे संस्कार झाले ते एकतर्फी किंवा ठोकळेबाज राहिले नाहीत. यांच्यातले जे जे विचार-भावनांना पोषक, उत्तेजक आणि प्रेरक होते ते त्यांच्या संवेदनक्षम मनाने टिपले आणि रिचवले. अखंड रवंथ आणि अभंग मनन–चिंतनाची याला जोड लाभली. यामुळेच सौ. मुक्ताबाईंच्या लेखनाला साहित्य प्रकार निरपेक्ष अशी परिमाणे निर्माण होतात. हे तो प्रचितीच्या बोलण्यात म्हणूनच पानापानातून आणि शब्दाशब्दातून याचा प्रत्यय येतो. सामाजिक, राजकीय, आर्थिक, नैतिक, साहित्यिक आणि अध्यात्मिक संदर्भ आणि उतारे यांच्या संगतीत आणि सूत्रात वावरणारे आणि अभिव्यक्त होणारे त्यांचे मानस सहज सुबोध ठरते. 'सूर्यकमळाच्या पाकळ्या' या शीर्षकाच्या लेखात वस्तुतः त्यानी दैवी योगायोगाची अनुभूति आविष्कृत केली आहे. आयुष्यात माणसे निरनिराळ्या कारणांनी एकत्र येतात, स्नेह वाढतो, नाती जुळतात–जमतात आणि हीच माणसे पांगतात. दूर होतात. दूरस्थ बनतात. दूरस्थ झाली तरी परस्थ झालेली नसतात. आपआपल्या कामात, व्यवसायात आणि नित्यनेमिक्रमात गुरफटलेली असतात. उपजिविकेच्या पण आवाक्याबाहेर असलेल्या वातावरणात फेकली जातात. या जीवनाच्या फेऱ्यात भौतिक आणि पार्थिव, प्राकृतिक आणि परिस्थितिजन्य अंतरे वाढतात. दैनंदिन जगण्याच्या प्रक्रियेत येणे–जाणे आणि आले–गेले यात जे क्षणिक स्मरण–विस्मरण चालू असते त्यात विस्मरणाचे क्षेत्र जे वाढते ते आभासमयच असते. कारण ती ती माणसे पुन्हा भेटतात. साहचर्य आठवते आणि जे गतगोष्टीचे पान सुकले असे वाटलेले असते ते हिरवेगार असल्याचा जणु साक्षात्कार होतो. ही काय किमया आहे? यात काही दैवी योजनेचा अंश असेल काय? सिंहावलोकन सारेच करतात. शोध घेतात पण घटना आणि घटित यांचे काही सूत्र असेल काय याचा तलास घेत नाहीत म्हणून कदाचित् असेल की, बोध घेत नाहीत. हाच तरल धागा शब्दांचे आणि विश्लेषक विवेचनाचे जडजंबाल टाळून सौ. मुक्ताबाईंनी किती लिलया पकडला आहे ते पाहण्यासारखे आहे.

आपण टेलिफोन करतो. डायल फिरवताना एका विशिष्ट अंकावर बोट ठेवतो व खालच्या दांड्यापर्यंत तो अंक खेचून आणतो. असे काही आकडे खेचून आणले की, आपणाला हवी असणारी घंटा ऐकू येते. माझ्या विचारमालिकेत तेच झालं. बालपणच्या मैत्रिणी, हा नंबर आठवून आठवून मी आकडे फिरवले, टेलिफोन लागला, माझ्या बालजीवनाची घंटा खणखणली.... नंबर तेथेच असतो. माणसे आपआपल्या ठिकाणीच असतात. फक्त आपण आठवणीने व अवधानाने नंबर लावला पाहिजे. आयुष्याची 'वेव्हलेंग्थ' अशाने जुळते. मुक्ताबाईंनी किती सहज रितीने हाच आशय खुलवला—रंगवला आहे.

'हे तो प्रचितीचे बोलणे' वरील थाटाचे आहे. त्यातला थाट म्हणूनच परिमाणमय आहे. या पुस्तकात एकंदर तेरा निबंध आहेत. सारेच सारखे आहेत म्हणता येणार नाही. अर्थात सगळेच सुरस आहेत, वाचनीय आहेत. त्याना विचारांचा—कल्लोळ—अल्लोळांचा मुलामा आहे. पण काही निबंध वाचनीय व चटकदार (माझा चोखंदळपणा, माझं डायनिंग टेबल, इ. इ.) असले तरी साहित्याच्या दृष्टीने मामुली स्वरूपाचे असून त्याना केवळ वृत्तपत्रीय लेखनाचेच महत्त्व काय ते असल्यासारखे वाटते. असे निबंध पुस्तकाच्या एकंदर दर्जेदारपणाला बाधित करतात. ते गाळण्याचा निष्ठुरपणा लेखिकेला दाखवता आला असता तर पुस्तकाचे बाळसे जरासे कमी होऊनहि ओचित्यपूर्ण ठरले असते.

पावणेदोनशे पानाच्या या पुस्तकात सर्वात अधिक भाग पानशेतवरच्या लेखनाचा आहे. हे 'हाहाःकार! १२ व १३ जुलै १९६१' 'हाहाःकार भोवतालच्या परिसरात' "—योगक्षेमं वहाम्यहम' अशा दोन निबंधात गुंफलेले आहे आणि ते पाऊणशे पानाचे आहे. म्हणजे जवळ जवळ अर्धा भाग या लेखनाचा आहे. हे पुस्तक वाचल्यावर मनावर कोणत्या लेखनाचा कायम व गहिरा ठसा उमटत असेल तर तो या पानशेतवरच्या लेखनाचा. त्यातहि 'हाहाःकार! १२ व १३ जुलै १९६१' हा लेख अतिशय हृद्य उतरला आहे. पानशेतवर एवढे लिहिले—बोलले—चर्चिले गेले आहे पण कशालाहि या लेखाची सर येणार नाही इतका तो अप्रतिम आहे. आत्मवृत्तात्मक आत्मीयतेनं नटलेल्या या लेखात अघटित, घटित आणि घटना, दैवी अनुग्रह आणि दुर्दैव यांच्या अनादि प्रवाहाबरोबर बुद्धीचे चढ-उतार, मनाची उघडझाप, जगण्याची आसक्ति—निरासक्ति यांचा प्रवाह असा बेमालूमपणे मिसळला आहे कीं, त्यातून एक आगळे चित्तस्पर्शी जीवन-दर्शनच होते. या लेखात एका प्रलयाचे तपशीलवार पण निवडक व सूचक असे गतिमान वर्णन आहे. म्हटला तर तो मनुष्याचे जगणे ढवळून काढणारा एक करुण इतिहास आहे. म्हटला तर एका सुविद्य, संवेदनक्षम आणि संस्कारी मनाचा तो एक तरल आविष्कार आहे. हे सारे असे प्रमाणबद्ध व लयबद्ध होऊनहि त्याला आखीव शिल्पाचे स्वरूप न येता ते एक रस निर्माण करणारे स्पंदन झाले आहे. यातील काही भाग उद्धृत करण्याचा मोह टाळता येणे अशक्य आहे:——

१. "आम्ही डेक्कन जिमखान्याच्या पटांगणापर्यंत आलो, दोन्ही बाजूंच्या बंगल्याच्या कंपौडांच्या भिंतीचे दगड इतस्ततः वेडेवाकडे पडलेले, बागातली झाडंझुडपं उन्मळून अस्ताव्यस्त झालेली! चौरस्त्यापर्यंत पोचलो आणि 'उध्वस्त' या शब्दाचा वस्तुपाठ पाहिला!"

२. इंटरनॅशनल बुक स्टॉल हे "दुकान म्हणजे केवळ 'पुस्तक' नावाचा विक्रीचा माल ठेवण्याची आणि विकण्याची जागा, त्याच्या मालकाच्या आणि सहकाराच्या चरितार्थाचं साधन एवढंच नव्हतं, तर त्याशिवाय आणखी असंख्य गोष्टींचं एकत्रीकरण होतं! ते दुकान म्हणजे त्याच्या मालकाच्या जीवनातल्या ज्ञानार्जनाच्या उरलेल्या आकांक्षांची मूर्तिमंत पूर्ति होती, आत्मप्रकटीकरणाचं साधन होतं, ते दुकान म्हणजे मनुष्य स्वभावाच्या अभ्यासाचं क्षेत्र, उच्च संस्कृतीचं एक विहार केंद्र व मैत्रीचे मळे पिकवणारी सकस भूमी होती."

३. "तो आघात मला खरा वज्राघात वाटला, तो आमच्या नव्हे तर उपेंद्राच्या दृष्टीनं.— विचारा! त्याचं आता कसं व्हायचं? काही लोक 'कसंहि करून' मुलाना इस्टेटी ठेवतात, आम्ही त्याला दारिद्र्य ठेवणार!" यावर मुक्ताबाईंना श्री. विठ्ठलरावांनी म्हटले 'हे पाहा उपेंद्राला श्रीमंत किंवा भिकारी करणार ही कल्पना पहिल्यादा सोडून दे. जो तो आपापलं नशीब घेऊन जन्मल्यानं त्यानंहि आपलं आणलंच असेल.'

पानशेतवरच्या या पहिल्या लेखाच्या मानाने दुसरे दोन लेख तेवढे चांगले उतरले नाहीत. किंबहुना पहिल्या रागातच उत्तम आवाज लागावा, राग खुलावा आणि उत्तरार्ध मात्र फिका पडावा तसे या दोन लेखांचे झाले आहे. ते वाढत्या श्रेणीचा उत्कर्ष साधावयास पूरक ठरत नाहीत. उलट पानशेतवरचा पहिला लेख वाचल्यावर मनावर जी 'धुन' चालू झालेली असते तिला मारक ठरतात हे दोन लेख. ह्या पुस्तकाचे साहित्यिक मोल एवढे स्वयंपूर्ण आहे कीं, पहिली आवृत्ति खपावयास फार अवधि लागणार नाही. दुसऱ्या आवृत्तीच्या मुद्रणाच्या वेळेस मात्र पुस्तक संपादित करण्याची जरुरी आहे. त्यावेळेस यातील वर निर्देशित निबंध वगळून पुस्तक प्रकाशित केल्यास अथपासून तिथपर्यंत एक सुंदर पुस्तक मराठी साहित्यात स्थिर होईल. एक सर्वस्वी वेगळ्या आशयाचे वाचनीय व संग्राह्य पुस्तक असेच कुणीहि या पुस्तकाबाबत निर्विवादपणे म्हणेल.

—दा. गो. देशपांडे

[**हे तो प्रचितीचे बोलणे**—ले. **सौ. मुक्ताबाई दीक्षित.** प्रकाशक : इंटरनॅशनल बुक सर्व्हिस, पुणे.]












मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास






## गेंड्याची पाठ

"**राजकारणात** आणि समाजकारणात कामे करणाऱ्या माणसांची पाठ गेंड्याची असायला हवी." असे एक महत्वाचे सूत्र कितीतरी वर्षांपूर्वी मी भालाकर भोपटकर यांच्या तोंडून ऐकले होते. त्या वाक्याची जबर पकड माझ्या मनावर आजही आहे. त्यामुळे राजकारणातल्या वा समाजकारणातल्या काही घटना पाहिल्या की काही काळ मन अस्वस्थ होते. पण मग सुरू होतो काही मूलभूत विचार. सध्या आपल्या देशातले राजकीय वातावरण अस्वस्थ व अशान्त करणारेच आहे. पश्चिम बंगालमध्ये संयुक्त आघाडी ह्या नावाने जी मोट बांधली गेलेली होती, ती तुटली आहे. हरयानामधल्या माकड उड्या पाहून तेथील जनता कंटाळली. उड्या मारून मारून व स्वार्थाची चिता वाहून वाहून लोकनियुक्त सभासद दमले-भागले (असावेत) असे मानून व फुकटही ती सर्कस पाहणे असह्य झाल्याने तेथे राष्ट्रपतीची राजवट सुरू झाली आहे. भाषिक बिलाच्या निमित्ताने उत्तर भारतीय राज्यांमध्ये, खुद्द दिल्लीमध्ये, जयपूरमध्ये प्रचंड प्रक्षोभ उसळला. 'अंग्रेजी हटावो' ह्या आंदोलनाने वाकडे वळण घेतले आणि भाषिक आंदोलनाबद्दल "हम भी कुछ कम नहीं" हे सिद्ध करण्यात साऱ्यांची स्पर्धा सुरू झाली. त्यानिमित्ताने जे घडले वाईट व निषेधार्ह घडले असले तरी त्याचे स्वरुप हे प्रतिक्रियात्मक होते वा आहे हे नाकारण्यात अर्थ नाही. दोन वर्षांपूर्वी मद्रासेत इंग्रजीच्या बाजूने असेच–नव्हे ह्याहून उग्र आंदोलन झाले होते. त्यासंबंधीची मूलभूत भूमिका आजही स्पष्ट नसल्याने हे घडते आहे. भाषा, विशेषतः परकीय, हा काही खरे म्हणजे ह्या स्वतंत्र प्रजासत्ताकात, वीस वर्षांनंतर आंदोलनाचा विषय होऊ नये. तो राष्ट्राचा व ज्या राष्ट्रीय एकात्मतेची जपमाळ आम्ही सतत ओढीत असतो त्याचा अपमान आहे असे कां वाटू नये? प्रत्येक भाषा समान आहे. त्यांना समान संधी मिळाली पाहिजे. फक्त अखिल भारतीय स्तरावर एक व्यवहाराची जोड भाषा हवी येवढेच मूळसूत्र. हे सूत्र होण्याचा मान भारतीय भाषेला मिळावा ही सामान्यतः योग्य व व्यावहारिक सूचना-मागणी ब्रिटिशांच्या गुलामीत आम्ही होतो. इंग्लिश शिकलो. ज्ञानी झालो. पण स्वतंत्र भारतात जोडभाषेचा मान भारतीय भाषेलाच मिळाला पाहिजे ही मागणी एकमुखाने व्हायला हवी होती. ही मागणी नवीन नाही. सिद्धांन्त नवीन नाही. हिंदी हीच ती भाषा असेल हे तत्वही घटनाधिष्ठितच. आणि तरीही दक्षिणेत आंदोलन झाले. आणि ते होताच थातुरमातुर एकतेचे प्रवक्ते असलेले राज्यकर्ते हादरले आणि व्यावहारिक तडजोडीला कायद्याचे स्वरुप द्यायला निघाले. सरकारला फक्त अहिंसेचे शिष्यत्व सांगत असूनही–हिंसेचीच परिभाषा कळते असा समज आजच नव्हे तर आंध्र निर्मितीपासूनच जनमानसात स्थिरावला आहे. लोकशाही मार्गाने, अर्जविनंत्या करूनही, निवडणुका जिंकूनही, (बेळगाव) न्याय मिळतोच असे नाही. म्हणून माणसे अखेर हिंसात्मक आंदोलने करतात. भाषिक आंदोलने हा त्याच भावनेचा ताजा अनुभव होता–आहे. प्रश्न सोडविण्यापेक्षा 'तात्पुरत्या सोयी' (स्वतःची तर सोय झाली पुढचा येणारा पाहून घेईल ही वृत्ती) करण्याकडेच अधिक लक्ष पुरविल्यामुळे व कुठल्याही समस्यावर मूलभूत सिद्धांतांच्या आधारे ठामपणे मांड मारून स्वार होण्याचे मनोधैर्य, ताकद नसल्याने गेल्या वीस वर्षांत आम्ही फक्त "आजचे मरण उद्यावर" ढकलीत आलो आहोत. उलट परिस्थिती मात्र अशी दिसते की अशी मांड मांडू शकले असते असे पंडितजी, शास्त्रीजींसारखे लोकनेते निघून गेले असून आता "कसेही करा, कसेही नांदा, काहीही बोला, पण हा कळप सोडू नका हो" अशा विनंत्या करून राष्ट्रीय एकात्मता राखण्यासाठी केविलवाणी (भाषा बिलासारखी) घडपड करणारे लोकनेतृत्व आज दिल्ली दरबारी वसत आहे. कम्युनिस्टांच्या विरुद्ध असंख्य पुरावे हाती असून, पश्चिम बंगालमध्ये त्यांनी निर्माण केलेली परिस्थिति ही स्फोटक असूनही, केरळमधल्या वार्ताही राष्ट्रीय हिताचे दृष्टीने फारशा उत्साहवर्धक नसताही, माओचे पोस्टर्स हाती घेऊन मिरविण्याइतपत धाडस ते व्यक्त करीत असूनही आणि संयुक्त आघाडीचे सरकार हाकलल्यावर तेथे झालेल्या आंदोलनात बॉम्बसकट अस्त्रांचा वापर केलेला दिसत असूनही, अनेक 'लिस्टवाले' लाल पुढारी भूमिगत होत आहेत. झाले आहेत हे कळूनही नक्षलबारीच्या वेळी जे घडले–व त्याचे चीनने जे समर्थन केले ते ठाऊक असूनही, अजय मुकर्जी यांचे पत्रक हाती असूनही, नंदांचे हाती (ते गृहमंत्री असताना) श्वेतपत्रिका असूनही "कम्युनिस्ट पार्टीच्या राष्ट्र विघातक 'कारवायांना' 'दंडुका' दाखवावा असे शासनाला वाटत नाही. किती जखमा झाल्या म्हणजे ऑपरेशन करणार? असा सवाल करण्याची वेळ आली आहे. कम्युनिस्टांचा लोकशाहीवर खरोखरच विश्वास असता तर बंगालच्या गव्हर्नरांनी दिलेली आव्हाने

त्यांनी स्वीकारली असती. आपल्याला बहुमताचा पाठिंबा आहे हे सिद्ध करण्याची संधी त्यांनी वारंवार दिली. घोष मंत्रिमंडळाने बोलावलेल्या विधानसभेत ती संधि अखेरची म्हणून दिली गेली. पण ती घेऊन जय सिद्ध करण्याऐवजी 'स्पीकरचा' आडोसा त्यांनी घेतला व स्पीकरने आपल्या अधिकाराच्या मर्यादा न ओळखता विधानसभाच बरखास्त केली. व गव्हर्नरचा अधिकारच 'चॅलेंज' केला. ह्यातून जो गुंता निर्माण झाला आहे त्याबाबत ही दिल्लीची पॉलिसी म्हणे 'गो स्लो' अशी आहे.

१९६२ साली चिनी आक्रमणाच्या वेळी कलकत्याच्या एका प्रकट सभेत 'आम्ही चिनी मुक्तिसेनेचे कलकत्यात स्वागत करू' असे ज्या ज्योति बसूंनी म्हटले होते तेच ज्योति बसु (देशाच्या दुर्दैवाने) बंगालचे उपमुख्यमंत्री झाले. व अजय मुकर्जींच्या कणाशून्य नेतृत्वापुढे बंगाल हा स्फोटक बनू शकला. बंगालच्या राज्यकर्त्यांना राज्य करू न देण्याचा संकल्प करूनच मुळी स्पीकरचा उपयोग करून घेण्यात आला. आणि आता त्या पेचातून कसे सुटावे ह्यासाठी दिल्ली 'गो स्लो' करीत बसली आहे. कम्युनिस्टांशी दोस्ती आणि कम्युनिझमवर लोकशाही कलम ही दोन पंडित नेहरूंची स्वप्ने होती. १९६२ साली सेला-बोमदिला व लडाखच्या भूमीवर पहिले स्वप्न गाडले गेले. त्या स्वप्नभूमीवर दोन गोष्टी कोरलेल्या आहेत. "महामना नेहरूंचे 'भाईभाई'चे स्वप्न तेथे गाडले गेले आणि भारताची हजारो चौरस मैल भूमी पराभव लादून चिन्यांनी बळकावली". त्यांचे दुसरे स्वप्न ह्या देशातल्या कम्युनिस्टांबद्दलचे होते. पण केरळ-बंगालच्या प्रयोगानंतर तेही संपले आहे. कम्युनिस्टांना 'राज'मान्यता देऊ नका अशी मागणी तेव्हा केली जात होती. ती पंडितजींनी फेटाळली.

ह्या प्रकरणी अभिनंदन करायला हवे ते राज्यपाल धर्मवीर यांचे! ह्या माणसात धैर्य आहे. आत्मविश्वास आहे. चाणाक्षपणा आहे. तत्परता आहे. पंजाब बंगालमध्ये हे त्यांनी सिद्ध केले आहे. प्रश्न त्यांच्या धाडसाचा नाही. दिल्ली ह्या विषयात कधी वेगाने चालणार हा आहे. प. बंगालच्या शासनाला 'डिसमिस' केले ते योग्यच केले. शासनाचा उपयोग करून व अजय मुकर्जींना मुठीत ठेऊन 'इप्सित' साध्य करण्याचा लाल डाव त्यामुळे उधळला गेला आहे.

**–सारस्वत**



अनेक फुले फुलती
फुलोनिया सुकोन जाती
परि त्याची कोण गणती
ठेविली असे–
परि जे गजेंद्रशुंडेने उपटिले
'श्रीहरि' साठी मेले.
कमलफूल ते अमर ठेले
मोक्षदायी पावन–––

**स्वातंत्र्यवीर सावरकर**

# कमलफूल ते अमर ठेले–

असेच एक कमलफूल श्रीहरिचरणी समर्पित झाले. ते फूल फुलले श्रीहरिसाठी. आणि मेलेही श्रीहरिसाठीच ! हे भाग्य साऱ्याच फुलांचे असत नाही. काही फुलतात भृंगारासाठी. काही फुलतात प्रेतासाठी. काही फुलतात फुलण्यासाठी आणि अखेर निर्माल्य म्हणून गळून पडण्यासाठी. काही फुलतात नुसत्याच शोभेसाठी आणि काही फुलतात ती त्यांना रुपगंध नसले तरी फुलावे लागते म्हणूनच. फुले फुलतात. काही तास जगाची, उद्यानाची शोभा वाढवितात. मान टाकतात. मातीत पडतात. मातीमय होऊन जातात.

पण ते कमलफूल फुलले. बहरले. त्याने श्रीहरिचरणांची शोभा वाढविली. कवित्वाने तर कधी अग्निगोलक हाती घेऊन. फुलांची प्रकृति मूलतः कोमल. तसे ते फूलहि कोमल होते. सागर शांत भासतो. पण शांत सागराच्या उदरात वावळे उद्भवतात. भूकंप, आगडोंब असतात. वीज असते आणि रत्नेही असतात. सागरमंथनातून सुराही स्रवली आणि सुधाही बरसली. तरीही सागर एकच. रुपे अनेक असली तरी माणूस एकच. श्रीहरीचा सुपुत्र ! जे जे घडते त्याची प्रेरणा माझा श्रीहरि आहे ही भावना मनात बळावली म्हणूनच पांडुरंग महादेव बापट योगी झाले. राजयोगी ठरले. आम्ही त्यांना प्रेमाने, आदराने सेनापति म्हटले खरे. पण ते अखेरपर्यंत होते सैनिकच ! सत्कार्याची हाक ही श्रीहरीची हाक. आणि "परित्राणाय साधूनाम्–विनाशायच दुष्कृताम्" ही तर त्या श्रीहरीचीच प्रतिज्ञा. मग हा सैनिक सतत अन्यायाचीच आव्हाने स्वीकारीत गेला. बॉम्बही केले. कविताही केल्या. झाडूही धरला. "अंतर्बाह्य शुद्धता लागते रे माझ्या श्रीहरीला" असं म्हणून जगातली घाण काढण्यासाठी झाडू घेतला. ते श्रीहरीचेच सैनिक. श्रीहरी तर बहुरुपी, बहुढंगी, बहुरंगी ! बापटांनी खूप भूमिका केल्या. त्याच्याच लीला मानून केल्या. ही माणसे मृत्यूच्या पाऊलवाटेनेच मुळी जीवनाचे रंग उधळीत चालत असतात. काहीना मैलाचे दगड आधी सांपडतात. काहीना नंतर ! सावरकरांचे नेतेपण इंग्लंडमध्ये मानले–अखेरपर्यंत पाळले. 'प्रतिज्ञा' ह्या पालनासाठी असतात ह्याचा वस्तुपाठ जन्मभर पडेल ते मूल्य देऊन गिरविला. आणि 'कमलफूल' होण्याचा मान संपादन केला. ८८ वर्षे जगूनही तात्या वृद्ध कधी झालेच नाहीत. दृष्टि क्षीण झाली होती. पण दिसत होते सगळे. श्रीहरीच्या डोळ्यातून ते सारे पहात. बालाचे हास्य होते त्याच्या जवळ आणि स्थितप्रज्ञाची गंभीरताही ! ज्ञानी होते. प्रकांड पंडित होते. पण दर्प नव्हता. अहंकार नव्हता. "वेष असावा बावळी परि अंगी असाव्या नाना कळा" असे तात्या होते. कणव होती आणि ज्वालामुखीही होता. त्याच मनात–त्याच शरीरात. आपण सारे कशाचे ना कशाचे तरी गुलाम असतो. मिंधे असतो. अनेक गंड खिशात घालून फिरणारी आपण माणसं ! ह्या

[पृष्ठ ६१ वर पहा]



### गोवा हिंदु अॅसोसिएशन कलाविभागाला

## पुन्हा दिल्ली दरबारी मानाचे पान

दिल्लीला संप, मोर्चे होतात, विले पास होतात, जाळली जातात. तसेच दिल्लीच्या कलाजीवनात आनंद भरणारे, तिला हसते, खेळते ठेवणारे कार्यक्रमही होत असतात. भारत सरकारच्या 'साँग अॅण्ड ड्रामा' विभागातर्फे एक नाट्योत्सव १९६५ सालापासून प्रतिवर्षी साजरा होत असतो. निरनिराळ्या प्रांतातून त्या त्या भाषेतले एकेक नाटक प्रतिवर्षी सादर केले जात असते. ही प्रथा सुरू झाल्यापासून महाराष्ट्रातर्फे मराठी नाटक सादर करण्याचा मान दि गोवा हिंदू असोसिएशनला मिळतो आहे ही गोष्ट साभिमान नमूद करतो. कलाविभागातर्फे १९६५ साली रायगडाला जेव्हा जाग येते, १९६६ साली मत्स्यगंधा व यंदा 'लेकुरे उदंड जाली' ही तीन नाटके दिल्ली वारी करून व महाराष्ट्राचा झेंडा मिरवून आली. ह्या तीन्ही नाटकांचे दिल्लीकरांनी सहर्ष स्वागत केले ह्याचे गमक म्हणजे महोत्सवाव्यतिरिक्तही ह्या नाटकांचे स्वतंत्र प्रयोग झाले आहेत. यंदाही ही मागणी होती पण संस्थेचाच नाइलाज झाला. ह्या संस्थेला हा मान सतत तीन वर्षे लागोपाठ मिळतो आहे ह्याबद्दल संस्थेचे मी अभिनंदन करतो. वसंत कानेटकरांचीच तीन्ही नाटके दिल्ली दरबारी गाजून आली म्हणून त्यांचेही अभिनंदन !! यंदाच्या प्रयोगाला गृहमंत्री ना. यशवंतराव चव्हाण, उपसभापति र. के. खाडिलकर मराठी खासदार व इतर मान्यवर महाराष्ट्रीय उपस्थित होते. 'लेकुरे'चा प्रयोग हमखास रंगतो, तसा तो दिल्लीतही रंगला. प्रेक्षक 'दाद' देत होते. ना. चव्हाणांनी व्यक्तिशः श्रीकान्त मोघे यांचे अभिनंदन करून 'दाद' दिली. मो. ग. रांगणेकर यांचेही त्यांनी खास अभिनंदन केले. गोवा हिंदु असोसिएशन नाट्यक्षेत्रात संपादीत असलेल्या यशाबद्दलही त्यांनी आनंद व्यक्त केला व संस्था चालकांचे अभिनंदन केले.

'लेकुरे' बद्दल उदंड आणि उदंड चांगले मी यापूर्वी लिहिले आहेच. उदंड यश संपादून दिल्लीहून परतलेल्या 'लेकुरे'चे आता खास अभिनंदन करतो. हा मान तिसऱ्यांदा गोवा हिंदु असो. कलाविभागाला लाभला आहे त्याबद्दल त्या विभागाचेच अभिनंदन करतो. चांगली नाटके उदंड साजरी करीत राहण्याचे 'अहोभाग्य' संस्थेला सतत लाभो हीच नटराजचरणी प्रार्थना ! काय राव, गंभीर काय झालात ? जरा हसा की! टाळ्या वाजवा टाळ्या. 'दाद' द्या. 'लेकुरे'तला राजा मी ! ओळखलं? नाही? हं ! छान ! चांगल्याला चांगलं म्हणा यार ! नुसते शब्द !! करा की खर्च !!

# देवकी

## [ पुस्तकातून रंगमंचावर ]

**एखाद्या** कथेची कादंबरी, मग कादंबरीचे एखादे नाटक (वा चित्रपट) अशी अवस्थांतरे आता मराठीत रूढ झाली आहेत. ही परंपरा काही अलिकडेच रूढ झालेली नाही. "रिकामा देव्हारा", "सुखाचा शोध" वरून देवता व सुखाचा शोध हे चित्रपट व "म. गो." यांच्या कादंबऱ्या–कथांवरून कुंकू, माझा मुलगा, शेवग्याच्या शेंगा वा वहिनींच्या बांगड्या हे चित्रपट पुष्कळ वर्षांपूर्वी निघाले. पण "कादंबरीची नाटके" हा प्रकार मात्र अलिकडे भलताच 'पॉप्युलर' होतोय् बघा ! त्यातल्या त्यात कोकणी कादंबऱ्यांना हा 'हवापालट' मानवतो (अपवाद राजेमास्तरांचा तेवढा) वाकी कोकणातली खोत मंडळी, गुरव मंडळी, माडाच्या राया, आणि आंब्यांची कलमं 'म्हमईच्या बाजारात भलताच भाव खाऊन जातात असं दिसतय खरं !' अलिकडेच एक कादंबरी असा उलटा प्रवास करीत नाट्य-रूपाने रंगभूमीवर आली. आता कादंबरी मोठी म्हटली म्हणजे नाटकही मोठं होतं वा असलंच पाहिजे असा नियम नाही. नाटक वेगळं-कादंबरी वेगळी-चित्रपट तर त्याहून आगळा. कादंबरीतली 'देवकी' नंतर सिनेमात 'जाणार' अशी खास वार्ता होती. 'वहिनीच्या बांगड्या'चे निर्माते सदाशिवराव कवि ह्यांनी तिला 'आवतण' दिलं होतं. पुढे काय झालं देव जाणे. पण आधी 'देवकी' नाटकात 'सजीव' होऊन आली. आम्ही प्रेक्षकांनी तिला 'सरूप' (व सुस्वरूपही) झालेली पाहिली. कादंबरी प्रसिद्ध होऊन बरीच वर्षे झाली असल्याने तिचे कथानक आता साऱ्यांना परिचित आहे असं मानून तिच्या नाट्यरूपाकडेच मी वळतो. कादंबरीत लेखकाला वाचक गृहित धरावा लागत असला तरी वाचक आणि प्रेक्षक ह्या तशा सर्वस्वी भिन्न भूमिका असतात. नाटकाला निवेदने चालत नाहीत. (जास्त) तिथे काहीतरी घडावे लागते. 'तो फार चांगला वा दुष्ट आहे' असे म्हणून चालत नाही. त्याचा प्रत्यय नाटकात लागतो. हा प्रत्यय सुद्धा त्या तीन अंकात व त्या चौकटीतल्या गृहित वास्तूत यावा लागतो. **बाबीकाका खोत** हा आधुनिक युगातला तसा रामावतार (फक्त परिटाचा (ही) संशय खरा मानून, पत्नीचे अग्निदिव्य पाहिले असूनही राम सीतात्यागाला सिद्ध होतो. इथे तसे घडत नाही. देवकी वचनाला पक्की ! ती शेवटी निघून जाते. ह्या आधुनिक रामाला सोडून) त्या गावचे दैवत. प्रारंभालाच गावातील चार पाच माणसे येतात. त्यांच्या ओसरीवरच्या चर्चेत (थोडे थोडे संवाद वाटून घेऊन जन गंगा (बोलत) वहात राहते. नाटक चालत (बोलत) राहिले पाहिजे. त्यातून कळते की खोत फारच सज्जन – लाख माणूस ! मग येतात खोत. बरोबर असते देवकी ! घरणाचे उद्घाटनाला खोत हवेतच. प्रेमाचा आग्रह. आढेवेढे–होकार हे सारे घडते. त्या ठिकाणी खोताच्या तोंडी एक अशा अर्थाचे वाक्य आहे की आज तुम्ही मला देव म्हणून डोक्यावर

घेत आहात. पण उद्या माझ्यात तुम्हाला दैत्य दिसू न लागो म्हणजे मिळविली. ही वाक्ये भविष्याचे सूचन करणारी असली तरी निर्मळ मनाचा, पत्नीवर नितांत प्रेम करणारा कनवाळू सज्जन खोतही "देवकी"च्या भेटीने थोडा फार हलला आहे असेही सुचवून जातात असे मला वाटते. अन्यथा खोताच्या मनात गावाविषयी मूर्तिमंत प्रीति, आत्यंतिक विश्वास असताना व 'देवकी'विषयी त्याचे मन निर्मळ असताना असे सूचन येण्याचे काही कारण होते असे वाटत नाही. 'देवकी'विषयीची त्याची भाषाही त्याची भावना शंभर टक्के निर्मळ नव्हती असे सुचवून जाते. त्यातूनच सरस्वतीच्या तोंडी एक वाक्य घातले आहे त्यात व्यक्त होणारा संशय ध्वनित होतो. "इतक्या उत्साहाने तुम्ही कधी मला सुद्धा पातळे आणली नाहीत" हे ते वाक्य! ! नाटकातल्या खोताचा (श्रीकान्त मोघे) ह्याचा हा 'अति उत्साह' जाणवतो. व तो 'निर्मळ' राहिलेला नाही. तो हलला आहे हेच सूचित करतो. खोताची झूल आणि हललेले मन ह्यांचा काहीतरी आंतरिक संघर्ष त्याच्या मनात चालू असावा—असला पाहिजे असे वाटत राहते. सरस्वतीही त्याच्या त्या वागण्याने प्रारंभी हालली, गोंधळली. मग त्याने 'देवकी'च्या आत्महत्येची कथा सांगितल्यावर मात्र तिने स्वतःला सावरले आणि बाबीकाकाच्या संरक्षणार्थ तिने रुग्ण असूनही छातीचा कोट केलेला दिसतो. खोत मोठा-सरस्वती मोठी — देवकी मोठी आणि खोतावरच्या निष्ठेपायी अखेर वेडा झालेला रुमड्याही मोठा ! अखेर नियतीला हे मोठ्यांचे मोठेपण मंजूर नाही. ही सारी माणसे जनतेच्या क्रोधात बुडून जातात. त्या क्रोधातून होणारा विनाश मुख्यतः मानसिक स्तरावरचा आहे. देवकी बाबीकाकाकडून दुसऱ्या लग्नाचे वचन घेते. आणि सरस्वतीच्या वचनातून स्वतःला मुक्त करून घेते. बाबीच्या मनातले द्वंद्व कौशल्यपूर्ण प्रकाश योजनेद्वारे व स्वगताचा वापर करून नाटककाराने रंगविले आहे. काव्य आणि नाटच ह्यांच्या स्तरावर ते सतत फिरत राहते. नाटकातला तो एक हृद्य भाग ! ह्या नाटकातला संघर्ष तसा मूलभूत स्वरूपाचा व काहीसा मानसशास्त्रीय असा आहे. मनात पाप नुसते 'नसून' चालत नाही. ते नसणे हे पुन्हा समाजाला 'जाणवले' पाहिजे. पटले — रुचले पाहिजे. समाजाचा ह्या असण्या-नसण्याशी तसा काय संबंध? पण आहे. (तसा तो सर्वच लोकनेत्यांबाबत असतो (उदा. दुसरा पेशवा नाटक) सामान्यांनी लफडी केली तरी चालतात. पण लोकनेता नुसता 'त्या' रस्त्याने दिसणेही महत्पाप मानणारा हा समाज आहे. इथे बाजीरावप्रमाणे बाबीकाकाला झुंजच द्यावी लागणार ! (अखेर उरी फुटणे आलेच)

हे नाटक तसे प्रकृतीनं गंभीरच ! पण गांभीर्याच्या पाठोपाठ येणाऱ्या उत्कटतेत हे नाटक काहीसे थिटे पडते असे जाणवत राहते. कदाचित श्रीकान्त मोघे व इंदुमति पैंगणकर (बाबीकाका व देवकी) ह्यांचे दुःख संवादांच्या माध्यमातून व अभिनयाच्या माध्यमातून प्रेक्षकांपर्यंत पोहचवायला ती दोघे वा लेखक कमी पडला असावा. देवकीला त्यामानाने वाव कमीच आहे. आत्महत्येच्या प्रसंगी, सरस्वतीला वचन देताना व शेवटी निघून जाण्यासाठी भूमिका तयार करताना ती बोलते तेवढीच ! बाकीचा तिचा कोंडमारा तिला (व प्रेक्षकांना) मूकतेनेच सहन करावा लागतो. काही आणखी उत्कट प्रसंग येणे आवश्यक वाटते. बाबीच्या स्वगतात व्यक्त होणारा भाव आधी कुठे तरी त्या दोघांना स्पर्शून गेलेला दाखवायला हवा होता. हे सारे बदल नुसत्या हसण्याने, असण्याने, लाजण्याने, नेत्रांच्या संकेताने वा बोलण्याच्या अयशस्वी प्रयत्नातून सूचित झाले असते तर ते तार्किक व मानसशास्त्रदृष्ट्याही योग्य ठरले असते. दोघांचेही समीप राहणे आणि तरीही जवळ येऊ न शकणे ह्या नियतीच्या लीलेने घडलेली कुचंबणा उत्कट रूप घेत नाही. ती ओठातून येते. पोटातून, हृदयाच्या गाभ्यातून येते असे वाटत नाही. त्यामुळे हे दुःख प्रेक्षकांना अस्वस्थ करीत नाही. Emotional Heightलाही नेत नाही. त्यामुळेच तेराव्या दिवशी गाव जेवायला येत नाही ह्याबद्दलची चीड व दुःखही उत्कट होत नाही. वधुपिता मुलीला घेऊन येतो याबद्दलचा उद्वेग, विषण्णता, कारुण्य मनाला अस्वस्थ करून सोडत नाही. गावाचे व त्याचे तिसऱ्या अंकातील भांडण हेही 'वादा'च्याच 'लेव्हल'-वर राहते. खोताची वेदना प्रेक्षकांच्या उरी कालवाकालव करून जात नाही. रुमड्याचे आग लावणे तार्किकदृष्ट्या पटले तरी घरण फोडणे पटत नाही. त्याचा आणि गावाचा बाबीखोतावरून सरळ सामना दाखवून मग तो तशाच तिरीमिरीत रात्री जाऊन धरण फोडतो असे दाखविले असते तर तर्कसंगति लागणे शक्य होते. 'ती कोण तुझी ? तिला बाहेर घालव' असे सांगणारा रुमड्या. अखेर त्या प्रश्नाचे उत्तर मिळत नाही, उलट धक्का मिळतो हे पाहून वेडा होतो असे सूचित होते. त्या वेडाला रंग आहे. जात आहे. देवकीचे घरटे पेटवून देणारी ती जात आहे. पण त्या आगीतून अखेर कधी नव्हे ते बाबीकाका व देवकी जवळ येतात. बाबीकाकाच्या स्वगतातून त्याची गणिते सुटलेली असतात. देवकीपुढे मात्र एक अवघड काम उरते. शेवटचा तो समरप्रसंगही त्याची अपरिहार्यता उत्कटपणे प्रेक्षकांपर्यंत पोहचवीत नाही. कमी पडते असे वाटत राहते.

नाटचप्रयोगाबाबत मात्र रांगणेकर यांचे अभिनंदन केले पाहिजे. आत्महत्येचा प्रसंग Spot Light च्या सहाय्याने सूचित करून निवेदन पद्धतीत येणारा संथपणा, सांकेतिकपणा त्यांनी घालवून परिणामकारकता साधली आहे. झोपाळा हे एक सुंदर प्रतीक त्यांनी कलापूर्ण रीतीने वापरले आहे. आंदोलने, मृत्यूनंतरच्या बांधलेल्या कड्या, त्या कड्यातून सूचित होणाऱ्या स्मृति आणि बाबीकाकाच्या पुनर्लग्नाच्या निश्चयाने त्या मोकळ्या होणे, त्यांना हर्ष होणे, देवकीच्या तोंडून नव्या नवरीलाही त्या कड्यांबाबतचे ऐकविण्यात आलेले सूचक भविष्य हे प्रसंग व घटना झोपाळ्याचा कलापूर्ण उपयोग दाखवितात. लहान पात्रांना सुद्धा 'व्यक्तित्व' देण्यात रांगणेकर किमया करतात. ह्याही नाटकातले गावकरी—त्यातला प्रत्येक जण वेगळा वाटला. शारीरिक व्यंगे देऊन वेगळेपण सूचित करण्याचा प्रकार ह्या गंभीर नाटकाच्या प्रकृतीशी विसंगत आहे हे जाणण्याइतपत रांगणेकर चाणाक्ष दिग्दर्शक आहेत, हे त्यांनी सिद्ध केले आहे.

'देवकी'चा हा नाटचावतार मधु मंगेश कर्णिक ह्यांच्या बद्दलच्या अपेक्षा मात्र वाढवतो. त्यांचे लेखन काव्यात्म व प्रसन्न आहे. कुठेही ते 'क्रूड' झालेले नाही. सुभाषितवजा वाक्यांचा सोस त्यांच्या लेखणीला आहे. पण नाटकात कथा रूपांतरित करताना अजून 'डीप' जायला हवे. घटनाचा वापर यायला हवा. निवेदनात उत्कटता यायला हवी. सुधीर फडके यांचे पार्श्वसंगीत रसवन्त आहे. नाटकापेक्षा संगीत मोठे असा प्रयत्न नाही. संयम आहे. ह्या नाटकातली रघुवीर तळाशिलकर यांची कामगिरी कीर्ती वाढविणारीच आहे. अपेक्षाभंग नाही. न्याय आहे. कर्णिक, रांगणेकर, करंबेळकर, फडके व तळाशिलकरांचे खास अभिनंदन !

—चित्रगुप्त










# इंद्रधनुष्य

—ज्ञानेश्वर नाडकर्णी

## संगीतः त्यांचे अन् आपले !

**रविवार** ता. १७ डिसेंबर १९६७. पहाटे उठताच फिरायला बाहेर पडलो. आकाशात उंचावर पूर्णचंद्राचे तेजस्वी बिंब पाहिले तेव्हाच म्हटले की आजचा दिवस चांगला जाणार !

सकाळी दहाला माटुंग्याच्या षण्मुखानंद सभागृहात जाऊन पोचलो. अत्याधुनिक कपडे केलेल्या कॉलेजयुवकांची व युवतींची ही गर्दी उसळलेली होती. तंग विजारी, मुलांच्या अन् मुलींच्या देखील ! खरे म्हणजे केस लांब वाढविलेले काही तथाकथित बीटनिक्स केवळ घोटलेल्या दाढीवरूनच पुल्लिंगी समजायचे. (काही) मुली तर इतक्या लुसलुशीत की बर्नार्ड शॉच्या नाटकातील सीझर क्लिओपॅट्राला म्हणतो त्याप्रमाणे त्याना काकडीगत खाऊनच टाकावेसे वाटावे. (विद्यर्थ वापरला कारण मी, खरोखरच, या बाबतीत निरीच्छ असतो ! )

'निर्मला निकेतन' या संस्थेच्या मदतीसाठी माझे एक ज्येष्ठ मित्र व मुंबईतील जुने व जाणते कलासमीक्षक रूडी व्हॉन लायडन यानी एक 'बीट संगीतस्पर्धा' आयोजित केलेली होती. मुंबापुरीत गेल्या काही वर्षात जी आलीशान, किमती उपाहारगृहे दिसू लागलेली आहेत त्यात चारचार वादकांचे बॅन्ड असतात. अशाच प्रकारचे, फक्त चार वादकांचे परंतु गणवेष, गाण्यांची व वाद्यांची धाटणी आणि एकंदर चेहरामोहरा या बाबतीत त्यांच्यापेक्षा कितीतरी जास्त अतिनवसांप्रदायी असे वाद्यवृंदही इथे कमी नाहीत.

रविवार सकाळच्या स्पर्धेत मूळच्या १४ वाद्यवृंदांच्या प्राथमिक चाचणीतून गाळून उरलेल्या पाच संचांची चुरस दिसत होती. षण्मुखानंद सभागृहात दोनतीन हजार श्रोते तरी होते—पैकी बहुतेक पौगंडावस्थेतील, अगर त्याहूनही अल्पवयीन !

बीट संगीत म्हणजे काय या प्रश्नाचे उत्तर शब्दात देणे कठीण आहे. त्याचे पहिले व्यवच्छेदक लक्षण म्हणजे त्याने तुमच्या कानठळ्या बसल्या पाहिजेत ! व्यक्तिशः मी ज्या दोन संचांचे संगीत ऐकले त्यात गाण्यापेक्षा मला बजावण्याचाच प्रकार जास्त बरा वाटला. अर्थात् कानाचे पडदे दोहो प्रकारामुळे हादरत होते. भूकंपाची आठवण ताजी असूनही हे असे झाले म्हणजे या बीट संगीताचा घोष किती प्रभावी असतो ते पहा !

आधुनिक नाट्यविचारात प्रेक्षक आणि नट यांच्यातील क्रिया-प्रतिक्रियांच्या परस्परपूरक स्पंदनाला जे महत्त्व असते ते लक्षात घेता, प्रेक्षागृहातील आरडाओरडचाचे आश्चर्य वाटावयास नको. 'याहू ऽ ऽ ऽ !' ही आरोळी आमच्या (आज चाळिशीच्या उंबरठ्यावर असलेल्या) पिढीलाही नवी ! त्या आरोळीचे निनाद चोहीकडून उठत होतेः अनेक आवाजात, परंतु किंचाळणे हा सर्वांचाच स्थायीभाव. शम्मी कपूरचे चित्रपट कोण पाहत असतील या माझ्या जुन्या शंकेचे त्या प्रेक्षागृहात सहजी निरसन होऊन गेले!

आपली नावड तीव्रपणे व्यक्त करण्याची पद्धत मात्र सांकेतिकः कागदी बाण व बोळे मारणे ! षण्मुखानंदसारख्या विस्तीर्ण प्रेक्षागृहातही माळ्यावरील गॅलरीत बसलेले शूर वीर थेट रंगमंचापर्यंत पोचणारे बाण फेकीत. काही बाण व बोळे अर्थातच आम्हा प्रेक्षकात पडत. माझ्या शेजारच्या वार्ताहराशी पैज मारून मी असलाच एक बोळा चक्क माझ्या समोर बसलेल्या सभ्य गृहस्थाच्या पाठमोऱ्या टाळक्यावर मारला— अन् त्याने मागे वळून बघण्यापूर्वीच खोटचा कुतूहलाने स्वतःच मागे वळून पाहत पाहत त्याला बेमालूम चकवून टाकले !

त्या प्रेक्षागृहाची मस्ती अशी जरी माझ्या अंगात चढत होती तरी रंगमंचावरील गोंगाट मला सहन होईना. दोन पंचमांश कार्यक्रम जेमतेम पाहूनच मी तेथून पळ काढला. पाश्चात्य संस्कृतीत पुरेपूर बुचकळून निघालेली ती पोरे पाहून एकच प्रश्न डोळ्यांसमोर उभा राहिलाः भारताच्या भावी प्रगतीला यांचा नेमका कोणता हातभार लागणार आहे ? माझे मत विचाराल तर आजकाल आपल्या शहरातील सधन वर्गाला जी सूज आलेली आहे तिचेच प्रतीक म्हणजे हे बीट संगीताचे चाहते ! यांना आपल्या भारतीय परंपरेचे, भारतीय भाषांचे अन् भारतीय आचारविचारांचे कसलेच सोयरसुतक नाही . . . जाऊ द्या झाले !

## थिरकवांचे चिरतरुण तबलावादन

त्याच दिवशी संध्याकाळी लॅमिंग्टन रोडवरील गोवा हिंदु असोसिएशनच्या स्वतःच्या मालकीच्या इमारतीत चौथ्या मजल्यावर झालेल्या एका अद्वितीय कार्यक्रमाला सुदैवाने माझी हजेरी लागली. असोसिएशनच्या कलाविभागाने जितेंद्र अभिषेकींच्या संचालकत्वाखाली जो संगीत शिक्षण वर्ग चालविलेला आहे त्याच्या विद्यार्थ्यांनी आपल्या शिक्षणाला पूरक ठरावा असा एक 'श्रुति रंजन' नामक विभाग सुरू केलेला आहे. त्याचे उद्घाटन चतुरस्र संगीत समीक्षक श्री. गोपाळकृष्ण भोबे यांच्या हस्ते झाले— व त्यालाच जोडून खांसाहेब अहमदजान यांचे तबलावादन !

ही केवढी अजोड पर्वणी होती म्हणून सांगावे ! संस्थेचे

सभागृह अगदी छोटे, जेमतेम दीड एकशे माणसे मावतील एवढे. कार्यक्रमाची जाहिरात झालेली नव्हती. श्रोतृवर्गात तबल्याचे मर्म जाणणारे ज्येष्ठकनिष्ठ बरेचसे कलावंत !

आणि खुद्द खांसाहेब म्हणजे एक चमत्कारच आहेत ! वय मोजून पुरी ८२ वर्षे ! चार मजले चढून ते वर आले हेच आश्चर्य. माणूस अशिक्षित. मी त्यांची स्वाक्षरी घेतली. थरथरत्या हातानी त्यानी उर्दूत काहीतरी खूणवजा दोन अक्षरे लिहिली. (मला तर ते तबल्याडग्ग्याचेच चित्र वाटते ! ) पण तबला डग्गा समोर असता याच वृद्ध पुरुषाचा हात तरुणाला स्मिमित करील अशा कायदेबाजीने चालतो.

खांसाहेबांचा हात विलक्षण गोड आहे ! तबला जणू काही त्यांच्या हाती गाऊ लागतो. उगाच नाही गंधर्वाचे गाणे सजविले या हातानी, देवा ! जाणकार म्हणाले, तबला, डग्गा अन् सारंगी. तंबोरा सर्वच किंचित् कणसूर होती. खांसाहेब स्वतः हातोडी क्वचित् मारीत; परंतु ते अंग त्याना नाही. त्यांची कला, त्यांची प्रतिभा निसर्गदत्त आहे. गंधर्वांकडे आपल्या कारकीर्दीची अन्य उमेदीची वर्षे घालविलेल्या श्रीपादराव नेवरेकरानी सांगितले: स्वारी नाटकाच्या आधी तासभर मच्छरदाणीत पडून असायची. दोन्ही हातांच्या बोटांनी गालांच्या तबल्याडग्ग्यावर ताल धरायचा ! तोंडाने बोल पुटपुटायचे. या समाधीतच गाण्यांची उजळणी व्हायची.

गंधर्व कंपनीत पाच पगारी तबलजी असायचे. राजण्णा हा त्यातला एक प्रमुख. थिरकवा ठराविक नाटके वाजवीत. काही नाटकात पहिले दोन अंक खांसाहेब तर उरलेले राजण्णा वाजवीत. एकदा पणजीस 'मृच्छकटिक' लावले होते. खांसाहेब आपली गोंडेदार मुसलमानी टोपी घालून, चिलमीचा बार ठोकून बाजूला बसले होते. 'माडीवरी चल ग गडे' हे गाणे येताच राजण्णाला उठवून स्वतः वाजवायला बसले. असे वाजविलेय् ! असे वाजविलेय् !

नेवरेकर म्हणाले: थिरकवा तबला वाजविताना प्रेक्षक खुर्चीवर नीट टेकून कधीच बसत नसत. सारखी दाद द्यायला पुढे सरसावून खुर्चीच्या कडेवरच जणु बसलेले असायचे.

त्या काळच्या आठवणीच इतक्या अंगांग रोमांचित करणाऱ्या तर थिरकवांचे त्या रविवारचे प्रत्यक्ष वादनच किती अविस्मरणीय असेल ! तबला चालू असताना अल्लारखांचा मुलगा जाकीर हुसेन पुढे येऊन बसला. खांसाहेबांना कोणीतरी सांगितले: हा अमुक अमुक ! खांसाहेबांच्या जराजर्जर दृष्टीला ओळख पटली. त्यानी त्याच्या डोक्यावर उजवा हात ठेवला अन् आशीर्वाद दिला. एका सनातन कलापरंपरेच्या दोन अध्वर्यूंना असे परस्परांना सामोरे जाताना पाहून त्या दिव्य वादनाने आधीच थरारून गेलेली आमची अंतःकरणे अधिकच उचंबळून आली.

जाकीरचे तबलावादन तो याहीपेक्षा वयाने लहान असताना ऐकले होते. तो बापसे बेटा सवाई तर होईलच; परंतु भवितव्याच्या मनात त्याला प्रतिथिरकवा बनविण्याचेही असेल.

ते महान् वाद्यसंगीत ऐकताना, दिवसचे दिवस कुंचला हाती न धरणाऱ्या माझ्यासारख्या होतकरू चित्रकारालासुद्धा स्फूर्ती आली.

हातात कृ. द. दीक्षितांचे 'षड्ज-गांधार' होते; त्याच्याच एका कोऱ्या पानावर खांसाहेबांचे चित्र रेखाटले झाले. अर्थात् त्यात एक मुद्याची गोष्टच राहिली आहे; ती म्हणजे खां-साहेबांचे तबला-डग्ग्यावर नर्तन करणारे हात! एक तर पानावरची जागा संपली होती अन् दुसरे म्हणजे त्यांचे ते किंचित् फोपशे, सुरकुतलेले हात नि ती देवदत्त बोटे रेखाटणे हे त्यांच्या तबलावादना-इतकेच महादुष्प्राप्य, कठीण आहे!! त्यांची 'डब्बल' मनगटे म्हणजे त्यांच्या जोषाचे रहस्यच !

रात्र संपली पण तो तबला अजून कानात गाणे गातो आहे. असे वाटते की हा महर्षी केवळ बोटांनी त्या चामड्याला खुणावत होता, खिजवीत होता, गोंजारत होता. अन् त्या पोकळीतून दिव्यत्वाचा स्पर्श लाभलेले एक संगीतस्वरूप मनोगत नाजूकपणे बाहेर पडत होते. त्या बोटांइतक्याच चपलपणे; नाजूकपणे ऐकणाऱ्याचे मनही नाचत होते. ज्यांनी ते तबलावादन त्या रात्री ऐकले ते धन्य! तो ८२ वर्षांचा अद्वितीय पुराणपुरुष आणि त्याचे वाद्यही धन्य !

★★

# त्रुफो यांचे फ्रेंच-इंग्रजी चित्रपट

स्थलाभावी फ्रेंच चित्रपट महोत्सवाचा आढावा पुढील अंकी देऊ. मात्र सदरहू महोत्सवात चमकलेल्या एका दिग्दर्शकाच्या दोन कृतींची ओळख एक झलक म्हणून करून घ्यावयास हरकत नाही.

फ्रान्स्वा त्रुफो हा तरुण फ्रेंच दिग्दर्शक पूर्वाश्रमी एक चित्र-पटसमीक्षक होता. गेल्या काही वर्षांत युरोपात, विशेषतः फ्रान्समध्ये, चित्रपटक्षेत्रात जी 'नवी लाट' उसळली तिचे धुरीणत्व करणाऱ्या-मध्ये त्रुफो हा एक. यापूर्वी त्याचे 'ज्यूल ए जिम' (ज्यूल आणि जिम) व 'फोर हंड्रेड ब्लोज' हे चित्रपट मी पाहिलेले होते; पैकी पहिल्यात त्याने चित्रसाध्य निवेदनशैलीचे एक आगळेच स्वरूप दाखविलेले होते. छोट्याछोट्या शॉट्सच्या साह्याने अतिशय गतिमान व प्रवाही अशा प्रकारचे दृश्य निवेदन त्याने साधलेले होते. ही खरीखुरी 'नवी लाट' होती खास!

'फोर हंड्रेड ब्लोज'चा विषय नावीन्यपूर्ण होता. आईबाप आपल्या प्रेमजीवनात गढून गेल्यामुळे त्यांचे दुर्लक्ष झालेला एक शाळकरी मुलगा गुंडपणा करतो अन् अखेर त्याला गुन्हेगार मुलांच्या विद्यालयात दाखल केले जाते. या विद्यालयातील हुकूम-लहरी शिक्षणपद्धतीचे त्रुफोने फार मर्मभेदक चित्रण केलेले होते; परंतु शैलीच्या दृष्टीने या चित्रपटाला 'ज्यूल ए जिम'ची सर नव्हती.

चित्रपटमहोत्सवात त्रुफोचे 'ला प्य दूस' (नाजूक कातडी) हे चित्र पाहावयास मिळाले. पन्नाशीजवळ येऊन ठेपलेल्या एका विवाहित लेखकाला विमानप्रवासात भेटलेल्या एका तरुण एअर-होस्टेसबद्दल आकर्षण वाटू लागते. त्याच्या पहिल्या भेटीची परि-णती चोरट्या प्रियाराधनात होते. परंतु एकदा ती दोघे त्याचे ज्या गावी व्याख्यान असते तेथे जातात व चारचौघात त्यांना एकत्र वावरता येत नसल्यामुळे त्यांची कुचंबणा होते. म्हणून पॅरिसला परतण्यापूर्वी ती दोघे एकदोन रात्री वाटेवरच्या एका गावात घालवितात. आपल्या नवऱ्याच्या या नव्या भानगडीचा संशय येऊन त्या लेखकाची बायको त्याला छेडते. तो घर सोडून जातो; परंतु विवाहबद्ध होऊन आपण सुखी होणार नाही हे त्याची प्रेयसी त्याला पटवून देते आणि त्याचा अखेरचा निरोप घेते. आपल्या घरी परतण्याचा व पत्नीशी समझोता करण्याचा विचार करीत तो लेखक एका उपाहारगृहात बसलेला असताना त्याच्या विवाह-बाह्य प्रेमप्रकरणाचा पुरावा त्याच्या बायकोला उपलब्ध होतो. बंदूक घेऊन ती त्या उपाहारगृहात येते अन् त्याला गोळी घालते!

मनाला न पटण्यासारखा व अतिशय भीषण असा या चित्र-पटाचा शवट सोडला तर त्यातील त्रिकोण, विशेषतः त्यातील प्रेमप्रकरण, त्रुफोने एखाद्या कादंबरीकाराच्या कौशल्याने रंगवि-लेले आहे. या चित्रपटाचे सर्वांत मोठे वैशिष्ट्य म्हणजे त्यातील लेखकाच्या भूमिकेला उठाव देणारे आजकालच्या फ्रान्समधील साहित्यजीवनाचे वातावरण! चित्रपटातील संवादांमधल्या विशिष्ट नावांच्या उल्लेखामुळेच नव्हे तर जां देसाली या नटाने केलेल्या त्या लेखकाच्या अस्सल भूमिकेमुळेही ते वातावरण प्रत्यय-कारी वाटते. उदा. तो लेखक बाहेरगावी ज्या व्याख्यानानिमित्त जातो ते आंद्रे गीद या जगद्विख्यात फ्रेंच लेखकाबद्दल असते, आणि त्याला जोडून गीदबद्दल एका प्रथितयश फ्रेंच दिग्दर्शकाने तयार केलेला एक अनुबोधपटसुद्धा दाखविण्यात येणार असतो. चित्रपटा-तल्या सिनेमागृहाच्या पडद्यावर गीदचा चेहरा आपल्याला दिसतो व त्याच्या पार्श्वभूमीवर सदरहू लेखक व व्याख्यानाचा आयोजक यांच्या छोट्याशा आकृती दिसतात. ही प्रतिमा विलक्षण परिणाम-कारक वाटते! शिवाय गीदच्या ज्या तत्त्वज्ञानाचा तो लेखक आपल्या व्याख्यानात उल्लेख करतो त्याचा प्रकाशझोत त्याच्या स्वतःच्याच तत्कालीन भावजीवनावर पडलेला असतो! साहि-त्याच्या पातळीवरील ही कलात्मक प्रगल्भता व प्रचलित वातावर-णाची प्रत्ययकारिता आपल्याला क्वचितच चित्रपटमाध्यमात दिसते.

जां देसाली हा प्रौढ वयाचा नट आपली भूमिका केवळ डोळ्यांनी करतो! ते विलक्षण भावदर्शी आहेत; विशेषतः त्यात लाजरेपणाची, अस्वस्थपणाची जी एक छटा अधूनमधून दिसते ती आपल्याला मोहवून टाकते. त्याचे अवघे व्यक्तिमत्वच त्या लेखकाच्या विवाहबाह्य प्रेमाच्या तपशिलात अर्थ भरण्याचे काम करते.

या महोत्सवाच्या आधीच काही दिवस त्रुफोचा पहिला इंग्रजी चित्रपट 'फॅरेनहाइट ४५१' हाही येथे पाहायला मिळाला. फॅरेन-हाइट ४५१ म्हणजे पुस्तके पेटण्यासाठी जे तापमान लागते ते! या चित्रपटातल्या काल्पनिक राज्यात पुस्तकांवर—सर्व पुस्तकांवर—व वाचनावर बंदी घातलेली असते! फायर ब्रिगेडचे लोक आगी विझविण्याऐवजी जागोजाग छापे घालून पुस्तके गोळा करतात व त्यांना आगी लावतात!

अर्थात् या दहशतीला कंटाळलेले काही ग्रंथप्रेमी लोक जवळ-पास, एका निवांत झाडीत वसाहत करून असतात. त्यातील प्रत्येकाने एकेक सबंध पुस्तक तोंडपाठ केलेले असते, व तो तो त्या त्या पुस्तकाच्या नावाने ओळखला जातो!

त्रुफोच्या चित्रपटात जो त्रिकोण आहे तो असा : फायर ब्रिगेड-मध्ये काम करणारा मॉन्टॅग, मॉन्टॅगची राजसत्तानिष्ठ बायको व त्याची ग्रंथप्रेमी मैत्रिण. या दोन्ही स्त्रियांच्या भूमिका अलीकडेच मुंबईकराना पाहावयास मिळालेल्या 'डार्लिंग', 'डॉक्टर झिवागो' व 'यंग कॅसिडी' या चित्रपटात गाजलेल्या, ज्यूली क्रिस्ती या, एकाच नटीने केलेल्या आहेत. त्या मैत्रिणीच्या प्रभावा-मुळे मॉन्टॅग चोरून पुस्तके वाचू लागतो. त्याची बायको फायर ब्रिगेडकडे चहाडी करते; परंतु त्यांनी छापा घालून मॉन्टॅगच्या घरातील पुस्तके जाळून टाकण्यापूर्वीच मॉन्टॅग आपल्या मैत्रिणीसह त्या बंडखोर ग्रंथप्रेमींच्या वसाहतीत पळून जातो असा या चित्रपटाचा शेवट आहे.

विषय नावीन्यपूर्ण असूनही 'फॅरेनहाइट ४५१' मध्ये त्रुफोच्या शैलीची चमक दिसून येत नाही. हा चित्रपट तयार करीत अस-ताना त्याने जी दैनंदिनी ठेवलेली होती तिच्यातील उतारे आनंदम फिल्म सोसायटीने प्रसिद्ध केलेले आहेत; ते मात्र वाचनीय आहेत. किंबहुना चित्रपट फसला तरी दैनंदिनी मात्र वैचित्र्यपूर्ण अनुभवांनी खच्चून भरलेली आहे!

●●●









## आमचेही एक मत

### आद्य स्त्री-नाटककार कोण?

स. न. वि. वि.

'दीपावली' मासिकाच्या दिवाळी अंकात प्रा. म. ल. वराडपांडे यानी मराठीतील पहिली स्त्री–नाटककार हिराबाई पेडणेकर या शिर्षकाखाली लेख लिहून प्रसिद्ध केला आहे. त्यांत त्यानी हिराबाईचा थोडक्यांत परिचय करून दिला आहे. आणि तिने १९०४ व १९१२ साली अनुक्रमे लिहून प्रसिद्ध केलेल्या "जयद्रथ विडंबन व "दामिनी' या दोन्ही नाटकांची माहिती दिली आहे. त्यानंतर श्री. सुमन्त जोशी यांनी "नवशक्ति" दैनिकाच्या दिनांक ९।११।६७ च्या अंकांत 'जनमनाचा कानोसा' या सदरात पहिली स्त्री–नाटककार या शिर्षकाखाली प्रा. वराडपांडे यांच्या लेखाचा उल्लेख करून कोणी तरी, केव्हा तरी ही जुनी माहिती उजेडात आणावयास हवी होती, असाही उल्लेख करून त्यांस घन्यवाद दिले आहेत. आपल्या लेखाच्या शेवटच्या परिच्छेदात म्हणतात, "पुरुषांचे बंड" हे एकच सामाजिक नाटक १९१२ सालात लिहिणाऱ्या सौ. गिरिजाबाई केळकर याना एक स्त्री–नाटककार म्हणून १९२८ साली तेहतिसाव्या नाट्यसंमेलनाचे अध्यक्षपद मिळाले आणि त्याच्या दहा वर्षां अगोदर दोन संगीत नाटके लिहिणाऱ्या हिराबाईना मात्र तो मान शेवटपर्यंत निदान १९५१ पर्यंत मिळू नये हे दुर्दैवच.

प्रा. वराडपांडे यानी मराठीतील पहिली स्त्री–नाटककर्ती म्हणून हिराबाई पेडणेकर याना दिलेला मान बरोबर नाही. कारण त्यांनी लिहिलेल्या दोन्ही नाटकापूर्वी सोनाबाई चिमाजी केरकरीण यानी १८९६ साली "संगीत छत्रपति संभाजी नाटक" लिहून प्रसिद्ध केले आहे. त्याची पृष्ठसंख्या १९२ असून आकार ५.१×३.४ व किमत १२ आणे आहे. शेवटच्या २२ पृष्ठांवर सोनाबाईचे चरित्र प्रसिद्ध आहे. ह्या पुस्तकाचे प्रकाशन बाळकृष्ण लक्ष्मण पाठक यानी केले असून मुंबई येथे जगदीश्वर प्रिंटिंग प्रेस मध्यें छापून प्रसिद्ध केले आहे. यावरून मराठीतील पहिली स्त्री–नाटककर्ती हा मान सो. चि. केरकरीण यांना मिळतो.

गोमंतकातील कुलनामाबद्दल त्या काळची थोडी माहिती दिल्यास उपकरणीय होईल. पोर्तुगीजांच्या अमदानीत त्या कालात हिंदू स्त्रीयांच्या कुलनामापुढे "ईण" ही अक्षरे जोडण्याची प्रथा होती अर्थात केरकर, पेडणेकर, केळकर, केंकरे ह्या कुलनामास "ईण" ही अक्षरे जोडली म्हणजे अनुक्रमे केरकरीण, पेडणेकरीण, केळकरीण, केंकरीण अशी हिंदुच्या स्त्रीयांची कुलनामे लिहिण्याची प्रथा होती. पण त्यास अपवाद होतेच. आता ही प्रथा लुप्त झाली असून फक्त सरकारी दप्तरात शिल्लक राहिली आहे.

गोवा —**काशिनाथ वासुदेव केंकरे**

[ पृष्ठ ५५ वरून–**कमल फूल** ...]

**गुलाम जगात तात्याराव सावरकरांप्रमाणेच तात्या बापट हे मुक्त होते. तोचि 'साधु' ह्या वर्तनातले ते 'साधु' होते. चौकटी फेकून दिलेले, लौकिकाच्या फूटपट्यानी न मोजता येण्यासारखे ते जीवन होते. कवीची कोमलता आणि क्रांतिकारकाचे स्थंडिल पांडुरंग महादेव बापट ह्या नावाने परिचित असलेल्या देहात एकवटलेले होते. सेनापति बापट ही व्यक्ति नव्हती. ती होती सत्कार्याची, महत्कार्याची प्रेरणा. ते होते प्रखर आत्मबल, ते होते मूर्तिमंत समर्पण. होता असामान्य त्याग. ही तर तेजाची बाळे ! मूर्तिमंत चंदन. सुगंधांचा अर्क. क्षणाक्षणाला मरून जीवनाला अर्थ प्राप्त करणारे हे तर अमरापुरीचे प्रवासी. श्रीहरीचा हा पुत्र देवाच्या वारी आला आणि मी देवाच्याच वारी त्याच्या दारी जाणार म्हणत म्हणत निघून गेला. कमलफूल ते अमर ठेले। मोक्षदायी पावन. अशांचे मृत्यु हे मृत्यु नसतातच. ते असतात अमरपुरीचे उत्सव. जाताना तात्या मुलीची पातळे उशाशी घेऊन सरणावर झोपले. ही सारी श्रीहरीची माया म्हणणाऱ्या तत्वज्ञाने मूकपणे माया उराशी कवटाळली आणि अखेर उशाशी नेली. त्याचीच लीला. त्याचीच माया. त्याचेच फूल. त्याचेच स्थंडिल. सारे शांत आणि तरीही चिरप्रेरक—चिरतारक!**

**अलौकिकाच्या अमरापुरीत गेलेल्या तात्यांच्या स्मृतीस लौकिक प्रणाम !!**

**—'आदित्य'**

[ पृष्ठ १० वरून –**पेंढारकर** ]

मोलाचे वाटते. चरित्र रोमहर्षक, सनसनाटी. पण 'चित्र आणि चरित्र' मात्र कलात्मक संयमाचा नमुना. सूचन मोलाचे. जाणकाराला कळावे इतपतच! हे तसे अवघड आहे. एखाद्याला मोहात पाडू शकणारे खचितच ! पण बाबूरावांनी एकूणच सारा तोल राखला. वागण्या-बोलण्यातली डिग्निटी, ग्रेस त्यांनी इथेही राखला. खूप पैसा मिळवला, उघळलाही. पण जीवनाबाबत ते कधी निराश झाले नाहीत. जीवनाबद्दल शेवटपर्यंत त्यांना तसा उदंड उत्साह होता. (अपवाद शेवटची एक दोन वर्षे) जीवनाकांक्षेने ओतप्रोत भरलेला, रसिकतेने जीवनातल्या सौंदर्याकडे पाहू शकणारा असा हा माणूस होता. खलनायकी मुळे गाजलेल्या नटश्रेष्ठ पेंढारकरांना चांदण्याचे व समुद्राचे विलक्षण वेड होते. रेडियो क्लबच्या हिरवळीवर ते जाऊन पडत. आत्मचरित्रातल्या त्या सुंदर आलेखानेच हे संकीर्तन संपवितो:

**ते लिहितात (पान १८६) "चंद्र म्हणजे दिवसाने रात्रीला लिहिलेले प्रेमपत्र" असे कुणीतरी म्हटलेले आहे. प्रेमपत्र वाचायचा कुणाला कधी कंटाळा येईल काय ? माझ्या आयुष्यात आजवर अनेक प्रसंग उद्भवले, पण त्यातून सुखरूप बाहेर पडण्याचा कानमंत्र मला प्रत्येक वेळी चंद्राच्या स्मित हास्याने व आनंदाने नाचणाऱ्या सागरलहरींनी दिला आहे. सृष्टि सौंदर्य पाहून मी मोहित होतो. पण त्यातही हसरा चंद्रमा व विशाल सागर ह्यांच्या दर्शनाने माझे अंतःकरण आनंदाने, उत्साहाने उचंबळून येते. काही कारणाने माझे मन निराश, निरुत्साही बनले असल्यास तर मी तात्काळ चंद्र सागरांच्या मंगल दर्शनासाठी धाव घेतो. सागर आपल्या अजस्त्र लाटांनी मला सांगतो, की "पहा ! माझ्या अंगात जग उलथून टाकण्याचे प्रचंड सामर्थ्य आहे. पण मला कितीही मोठी भरती आली तरी माझी मर्यादा मी कधी सोडली आहे का ? तशी तू सुद्धा आपली मर्यादा सोडू नकोस. मर्यादा सांभाळून वाग. नयनमनोहर चंद्राच्या मधुर, दिव्य गीताने व अथांग सागराच्या मर्मर संगीताने मी भारावून जातो. नकळतच माझे दोनही कर त्यांना भक्तिभावाने वंदन करण्यासाठी आपोआप जुळतात."**

• • •








# सर्वांचे मनःपूर्वक अभिनंदन !!

# हाऊज दॅट ? यस्, यांनी 'स्कोअर' केले !!

प्रिय वाचक,

१९६७ च्या दिवाळी अंकांत "हाऊज दॅट ?" ह्या शीर्षकाखाली आपला कौल मागणारे एक कूपन देण्यात आले होते. त्यात मला आवडलेली कथा। लेख। कविता । रंगीत कलाकृति। व्यंगचित्र वगैरेबाबतची आपली प्रतिक्रिया जाणून घेण्याचा हेतु होता. त्या योजनेला आपण जो सक्रिय पाठिंबा दिलात त्याबद्दल आम्ही प्रथमतः त्या स्पर्धेत भाग घेणाऱ्या वाचकांचे आभार मानतो. तसेच ह्या स्पर्धेत जे वाचक यशस्वीपणे भाग घेऊ शकले त्या यशस्वी स्पर्धक वाचकांचे आम्ही अभिनंदन करतो. अखेर आपला निर्णय हा 'आरसा' आहे असे आम्ही म्हटले होते. चोखंदळपणे अंक वाचून आपण दिलेला निर्णय आम्ही खाली देत आहोत. स्पर्धेबाबतचे नियम पूर्वी प्रसिद्ध केले आहेतच.

## हे निवडून आले आहेत

(१) सर्वोत्तम कथा ....... भेट...............पु. भा. भावे.........१२६ मते
(२) सर्वोत्तम लेख ...... एकेकाचं मराठी..पु. ल. देशपांडे......१३९ मते
(३) सर्वोत्तम कविता ..... दुमार.........कान्त............१४० मते
(४) सर्वोत्तम व्यंगचित्र ..... अहा भारत विराजे-नं. ७...........११५ मते
(५) रंगीत कलाकृति ...... शेवंती.......चित्रकार दलाल.......१७० मते

## बिनचूक विजेता

१) गजानन का. क्षीरसागर, सांताक्रुझ, मुंबई. २) दत्तात्रय पांडुरंग कदम, मुंबई-१

## एक चूक विजेते

१) सौ. सुरेखा शिवराम बोंबे, मुंबई. २) विजय स. जोग, नागपूर. ३) सदानंद य. रणदिवे, पनवेल. ४) एम. डी. मुंगळे, सोलापूर. ५) बाळकृष्ण पर्शुराम गायकवाड, मुंबई. ६) सुरेंद्र भोसले, मुंबई. ७) मा. मा. पोळ, डोंबिवली. ८) सौ. नंदा कमलाकर शिंदे.

## दोन चुका विजेते

१) मालती शी. शाह, मुंबई. २) राजा नारळे, नागपूर. ३) मनोज माईणकर, डोंबिवली. ४) सौ. राधिका उ. नाईक, मुंबई. ५) नारायण रा. हरळीकर, कोल्हापूर. ६) सुधाकर मा. ववळे, पुणे. ७) यशवंत चव्हाण, मुंबई. ८) शरद्चंद्र बा. सावंत, मुंबई. ९) राजेंद्र माणिकलाल हिराचंद पटेल, येवले. १०) सुभाष शंकरराव नाईक, पुणे. ११) मधुकर दामोदर गुरव, वडगाव–जिल्हा कोल्हापूर. १२) सौ. सीमा पा. खालापूरकर, मुंबई. १३) नारायण शिवराम पाताडे, मुंबई.

**"हाऊज दॅट ?"** ह्या स्पर्धेत एकूण ३३७ वाचकानी भाग घेतला. पुष्कळानी आपली मते पत्रातच लिहून पाठविली, त्यांचा संपादन करून **'स. न. वि. वि.'** ह्या सदरासाठी उपयोग करण्यात आला. **कुपन्सचाच फक्त सदर स्पर्धेत विचार करण्यात आला आहे.** यशस्वी लोकांचे, स्पर्धकांचे आम्ही प्रगट अभिनंदन करतो.

**टीपः–** ज्या स्पर्धकांना आपले कूपन बिनचूक आहे असे खात्रीपूर्वक वाटत असेल त्यांनी १० जानेवारी, १९६८ पर्यंत पत्र-द्वारे कळवावे. नंतर आलेल्या तक्रारीचा विचार केला जाणार नाही. विजयी स्पर्धकांना बक्षीसाची रक्कम २० जानेवारी १९६८ पर्यंत रवाना केली जाईल. तिसऱ्या बक्षिसाच्या १३ मानकऱ्यांना रोख रक्कम न पाठविता 'दीपावली'चे जानेवारी, फेब्रुवारी व मार्च असे तीन अंक पाठविण्यात येतील. यासंबंधी कोणताही पत्रव्यवहार करू नये.

**–व्यवस्थापक**

